# अनुक्रमाणिका

# ❀ संपादकीय ❀

आज केवळ भारतातच नव्हे तर भारत देशा बाहेर देखील भाद्रपद शुद्ध चतुर्थीपासून दहा दिवस श्री गणेश उत्सव मोठ्या प्रमाणात घरात घरातून उत्साहात साजरा केला जात आहे. कोणत्याही कार्यारंभी श्री गणेश पूजन व प्रार्थना केली जाते. आपण हाती घेतलेले कार्य विना संकट सुलभ व्हावे यासाठी ही प्रार्थना असते. आपणास माहीत असलेले गणेश स्वरूप हे फक्त एवढेच आहे परंतु गणेश स्वरूप हे या पेक्षाही अत्यंत भिन्न व व्यापक आहे. हेच तत्व संक्षेपाने सांगण्यासाठी यंदाचा हा श्री गणेश उत्सव विशेषांक! संक्षेपाने सांगण्याचा अर्थ एवढाच की गणेशतत्त्व विस्तृत सांगण्याची शक्ती अवघे ब्रह्म, शिव, विष्णू यांच्यात देखील नाही.

खरे तर या बुद्धीदात्यावर अनेकानेक विशेषांक, पुस्तके यापूर्वीच प्रकाशित झाली आहे. साधारणतः अशा विषयांवरच्या पुस्तकांमध्ये तोचतोचपणा येण्याची दाट शक्यता असते कारण सर्वत्र लेखक पूर्वीच्या संदर्भांचा उपयोग करत असतात. परंतु सदर विशेषांकात हाच "तोचतोचपणा" येणार नाही ही काळजी कटाक्षाने घेतली आहे.

प्रस्तुत विशेषांकात श्री गणेशांविषयीची थोडक्यात परंतु प्रत्येकास माहीत नसणारी माहिती साध्या, सोप्या व रंजक भाषेत देण्याचा प्रयत्न केला आहे. गणेश पुराणोक्त अष्टविनायकांची माहिती व मुद्गल पुराणोक्त भगवान श्री गणेश यांचे काही अवतार यांची देखील माहिती मी मुद्दामूनच समाविष्ट केली आहे. शिवाय बरीच स्तोत्रे, कवणे यांचाही अंतर्भाव केलेला आहे. त्याचप्रमाणे आमच्या सदस्यांचे लेख, विनोद, बाल मित्रांनी पाठविलेली चित्रे ही देखील याच अंकात प्रकाशित करण्यात आली आहे.

थोडक्यात म्हणजे हा विशेषांक भगवान श्री गणेशांविषयी अमूल्य माहिती वाचकांस प्रदान करणारा खजिनाच आहे असे म्हणावयास हरकत नाही!

पुस्तकासंबंधी चे मत निःसंकोचपणे कळवावे हे वाचकांना सांगणे न लगे!

**भगवान श्री गणेशांच्या चरणी विनम्र भावाने अर्पण...**

**- सात्विक मुरडे**

# ❁ श्री गणेशांबाबत काही प्रश्न व त्यांची उत्तरे!

**१. दुकानातून मूर्ती आणताना ती भंगली तर काय करावे ?**

त्या मूर्तीचे लगेच विसर्जन करून मनात कोणतीही शंका-कुशंका, काळजी, चिंता, विवंचना न ठेवता श्रीगणेशाला प्रार्थना करून नवीन मूर्ती आणावी.

**२. श्रींच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाल्यावर ती भंगली तर आपण काय करावे ?**

हानी छोटी असेल तर मूर्ती दुरूस्त करावी. मोठा भाग भग्न झाला असेल तर मात्र त्या मूर्तीचे विसर्जन करून नवीन मूर्ती आणावी व तिची प्राणप्रतिष्ठा करावी.

**३. मूर्तीचे घरी विसर्जन झाल्यावर ती मूर्ती जलार्पण करायला नेताना अपघाताने ती भंगली तर काय करावे ?**

श्रींचे विसर्जन घरी केले असल्यामुळे काहीच करायला नको; परंतु मनःशांतीसाठी वाटल्यास आकस्मिक विघ्नशांती करावी.

**४. मूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाल्यावर सोयर वा सुतक आल्यास काय करावे ?**

ज्यांना ही अडचण नसेल अशा नातेवाईकांकडून वा ब्राह्मणाकडून विधीवत पूजन करून प्रथेनुसार योग्य दिवशी श्रींचे विसर्जन करावे.

**५. घरातील कोणी प्राणप्रतिष्ठेनंतर निधन पावले तर काय करावे ?**

ब्राह्मणाकडून गणेशमूर्तीचे विसर्जन करावे व नंतरच मृत व्यक्तीचे संस्कार करावेत. मृतदेह इस्पितळात असेल तर विसर्जनानंतरच तो देह घरी आणावा.

**६. प्राणप्रतिष्ठित मूर्तीची पूजा आपण शूचिर्भूत होऊन सोवळे नेसूनच का करावी ?**

खरे तर, देवपूजा ही सोवळे नेसून, स्नान, संध्या करूनच करावी हे बरे. मनात पावित्र्याचे भाव कायम राहण्यासाठी एवढे करायलाच हवे.

**७. ओवळ्याने मूर्तीला शिवले तर?**

चुकून स्पर्श झाल्यास क्षम्य; परंतु जाणतेपणे कोणीही तसे चुकूनसुद्धा करू नये.

**८. प्राणप्रतिष्ठा करणाऱ्याला विसर्जनापूर्वी अचानक परगावी जावे लागले तर काय करावे ?**

घरातल्या अन्य व्यक्तीने काळजीपूर्वक श्रींचे पूजन व विसर्जनादी विधी पूर्ण करावेत.

**९. घरात उभ्या गणपतीचे चित्र व मूर्ती का ठेऊ नये ?**

याला शास्त्राधार नाही; परंतु असा समज समाजात रूढ आहे हे मात्र खरे.

**१०. नवसाचा गणपती एकाच वर्षी आणून चालतो काय ?**

असे करू नये. उलट नवसाला पावलेल्या देवाची पूजा वर्षानुवर्षे न चुकता मनोभावे करायलाच हवी.

**११. पुरोहित (गुरुजी) (ब्राह्मण) उपलब्ध नसेल तर पूजा कशी करावी ?**

वैदिक मंत्र न म्हणता पुराणोक्त मंत्र म्हणून आपणच अत्यंत प्रसन्न चित्ताने शुचिर्भूत होऊन श्रींची पूजा करावी. पूजेची ध्वनीफित ऐकत पूजा केली तरी ती सर्व पूजा म्हणावी. नुसती कॅसेट ऐकून आपण पूजा करू नये.

**१२. मुलांनी खेळात स्वतंत्र गणपती बसवला तर चालतो काय ?**

चालेल. प्राणप्रतिष्ठा न झालेल्या मूर्तींची पूजा व आरती करावी. यामुळे लहान मुलांवर सुसंस्कार होतात; परंतु याचा खेळ होऊ देऊ नये. १५ ऑगस्टला छातीवर मिरवलेला तिरंगा १६ ऑगस्टला पायदळी तुडविला जातो असे होऊ देऊ नये.

**१३. गौरीशंकर हे भगवान श्री गणेशाचे माता पिता आहेत काय?**

नाही, हा एक खूप मोठा गैरसमज आहे. भगवान श्री गणेशाचे कोणीच माता पिता नाहीत ते स्वतः अनादि व अनंत आहेत. शिव आणि पार्वती हे फक्त भगवान श्री गणेशाच्या अवताराचे माता-पिता होत. अधिक माहितीसाठी श्री गणेश पुराण व श्री मुद्गल पुराण वाचावे.

# ❀ आपला गणपती आपणच बसवा ❀

गणेश मूर्ती बाहेरून आणताना ती वस्त्राने झाकूनच आणावी तसेच त्यावेळी मूर्तीचे तोंड आपल्याकडे असावे. गणरायास घरी आणताना घराच्या दाराबाहेर गणपतीला तांदूळ व पाणी यांनी ओवाळावे व नंतर या वस्तू बाहेर टाकून द्याव्यात. नंतर गणपती आणणा–या व्यक्तिच्या पायावर गरम पाणी व दूध घालावे तसेच श्रीगणेशाला व ती मूर्ती आणणाऱ्या व्यक्तीला कुंकू लावावे. त्यानंतर गणपती घरात आणून तांदूळ पसरून वर थोडे कुंकू वाहून त्यावरच तो गणपती ठेवावा तसाच ठेवू नये.

**गणपती प्रतिष्ठापना पूजेचं साहित्य–**

– शाडू मातीची गणपती मूर्ती

– हळद, कुंकू, अक्षता, गुलाल, अष्टगंध, अक्षता

– सुपारी,खारीक, बदाम, हळकुंड, अक्रोड

– रेशीम कापड, कापसाची वस्त्रे, जानवी जोड, पंचा,

– तांदूळ, तुळस, बेल, दुर्वा, फुले, पत्री, हार, आंब्याच्या डहाळे

– नारळ, ५ फळे, विड्याची पाने

– कच्चे दूध, दही, शुद्ध तूप, साखर, मध,

– कलश, ताम्हण, पळी, पंचपात्र, सुटे पैसे.

– चौरंग, आसन, नैवेद्याची तयारी, समई, वाती, निरांजन, कापूर.

– हात पुसण्यासाठी फडके, देवाचे अंग पुसण्यासाठी कापड

– कापसाची वात, चार लहान वाट्या, चंदन, दूर्वा.

**अशी करावी गणपती प्रतिष्ठापना पूजा---**

– गणेश चतुर्थीच्या दिवशी सकाळी लवकर उठून प्रात:स्नान–संध्या पूजादी नित्यविधी करावेत.

– गणपती मूर्ती ठेवण्याची जागा स्वच्छ करून घ्या.

– पाटावर अक्षता पसराव्यात. यानंतर त्यावर मूर्ती स्थापन करावी.

– 'श्रीपरमेश्वप्रीत्यर्थ पार्थिवगणपतिपूजनमहं करिष्ये' असा संकल्प म्हणून पाणी सोडावं.

– कलश, शंख, घंटा व दीप यांचे पूजन करून गंध, अक्षता, पुष्प अर्पण करावं.

– गणपतीच्या नेत्रांना दुर्वांनी तूपाचा स्पर्श करावा.

– मूर्तीच्या ह्रदयाला आपल्या उजव्या हाताच्या अंगठ्याने स्पर्श करून प्राणप्रतिष्ठेचे खालील मंत्र म्हणावेत.

**अस्यै प्राणा: प्रतिष्ठंतु अस्यै प्राणा: क्षरन्तु च।**

**अस्यै देवत्वम् आचार्यै मामहेति च कश्चन।।**

**रक्तांभीधिस्थ पोतोल्ल सदरुण सरोजाधि रुढाकराब्जै:।**

**पाशम् कोदंड भिक्षूद्भवमथ गुणमप्यम् कुशम् पंचबाणान्।।**

**बिभ्राण असृक्कपालम् त्रिनयन लसिता पीनवक्ष ऊरुहाढ्या।**

**देवी बालार्क वर्णा भवतु सुखकरी प्राणशक्ती: परा न:।।**

गणपती बाप्पाला नमस्कार करावा आणि पुढील मंत्र म्हणावा...

**एकदंतम् शूर्पकर्णम् गजवक्त्रम् चतुर्भुजम्।**

**पाशांकुशधरम् देवम् ध्यायेत सिद्धिविनायकम्।।**

**ध्यायेत देवम् महाकायम् तप्तकांचन संनिभम्।**

**चतुर्भुजम् महाकायम् सर्वाभरणभूषितम्।।**

**दंताक्षमाला परशुपूर्ण मोदक हस्तकम्।**

**मोदकासक्त शुंडाग्रम् एकदंतम् विनायकम्।।**

अंत:करणात श्रीगणेश मूर्तीचं ध्यान करून पुढील आवाहन मंत्र म्हणावा...

**आवाहयामि विघ्नेश सुरराज आचिर्तेश्वर।**

**अनाथनाथ सर्वज्ञ पूजार्थ गणनायक।।**

**श्रीसिद्धिविनायकाय नमः। आवाहयामि।।**

श्रीगणपतीच्या पायांवर फुलानं पाणी अर्पण करून अर्घ्य मंत्र म्हणावा...

**अर्घ्यम् च फलसंयुक्तम् गंधपुष्प आक्षतैर्युतम्।**

**गणाध्यक्ष नमस्तेस्तु गृहाण करुणानिधे।।**

**श्रीसिद्धिविनायकाय नमः। अर्घ्यम् समर्पयामि।।**

पळीभर पाण्यात गंध, अक्षता, पुष्प व सुपारी ठेवून त्यातले पाणी फुलानं श्रीगणेशांना अर्पण करावे.

नंतर पंचामृत स्नान मंत्र म्हणावा...

**पयो दधि घृतम् चैव मधुशर्करया युतम्।**

**पंचामृतेन स्नपनम् प्रियताम् परमेश्वर।।**

**श्रीसिद्धिविनायकाय नमः। पंचामृत स्नानम् समर्पयामि।।**

पंचामृत म्हणजे दूध, दही, तुप, साखर आणि मध एकत्र करून ते फुलानं गणपतीला अर्पण करावं. अथर्वशीर्ष म्हणून अभिषेक करावा.

**गणाधिप नमस्तेस्तु उमापुत्राघनाशन।**

**एकदंते भवक्त्रेति तथा मूषकवाहन।।**

**विनायकेश पुत्रेति सर्वसिद्धिप्रदायक।**

**कुमारगुरवे नित्यम् पूजनीयाः प्रयत्नतः।।**

हे मंत्र म्हणून २१ दुर्वा श्रीगणेशांना अर्पण कराव्या. गणपतीची आरती करावी.

नंतर नैवेद्य दाखवावा. यावेळी खालील मंत्र म्हणावा....

**नैवेद्यम् गृह्यताम् देव भक्तिम् मेह्यचलाम् कुरु।**

**ईप्सितम् मे वरम् देहि परत्र च पराम् गतिम्।।**

**श्रीसिद्धिविनायकाय नमः। नैवेद्यम् समर्पयामि।।**

पुढील मंत्र म्हणून गणपतीसमोर साष्टांग नमस्कार घालावा.

**नमः सर्वहितार्थाय जगदाधार हेतवे।**

**साष्टांगोयम् प्रणामस्ते प्रयत्नेन मया कृतः।।**

**दररोज सकाळी आणि संध्याकाळी गणपतीची आरती करावी. नैवेद्य दाखवावा.**

# ❀ यंदाचा श्रीगणेश स्थापना शुभ मुहूर्त ❀

यंदा गणेश चतुर्थी तिथी ३० ऑगस्ट २०२२ रोजी दुपारी ०३:३३ वाजता सुरू होईल. त्यानंतर ९ सप्टेंबर रोजी अनंत चतुर्दशीला गणेशमूर्तीचे विसर्जन करण्यात येणार आहे. या १० दिवसांत लोक गणेश उत्सव त्यांच्या श्रद्धेने आणि भक्तीने साजरा करतात आणि त्यांच्या स्वतच्या पद्धतीने आणि परंपरेनुसार गणपतीची पूजा करतात. भाद्रपद चतुर्थी ३० ऑगस्ट २०२२ मंगळवारी दुपारी ०३:३३ वाजता सुरू होईल आणि दुसऱ्या दिवशी ३१ ऑगस्ट २०२२ रोजी बुधवारी दुपारी ०३:२२ वाजता संपेल.

गणपती स्थापनेचा शुभ मुहूर्त ३१ ऑगस्ट रोजी सकाळी ११:०५ पासून सुरू होईल आणि १ सप्टेंबर रोजी दुपारी ०१:३८ पर्यंत राहील. अशा स्थितीत ३१ ऑगस्ट रोजी दिवसभरात ११:०५ मिनिटांनीच गणेशमूर्तींची प्रतिष्ठापना केली जाईल.

**३१ ऑगस्ट २०२२ रोजी सकाळी ११:०५ ते दुपारी ०१:३८ पर्यंत गणेश प्रतिष्ठापना मुहूर्तावर हे लक्षात ठेवा.**

# ❀ वेदोक्त श्री गणेश स्तवणे ❀

**गणानां त्वा गणपति॰ हवामहे प्रियाणां त्वा प्रियपति हवामहे निधीनां त्वा निधिपति॰ हवामहे वसो मम । आहमजानि गर्भधमा त्वमजासि गर्भधम् ॥ (शु०यजु० २३ । १९)**

हे गणेशा ! सर्व गणांचा स्वामी आणि आवडत्या वस्तू आणि प्राणिमात्रांचा सांभाळ करणारा आणि सर्व सुख निधिंच्या निधीपती, आम्ही तुम्हाला आमंत्रित करतो. तू विश्वाचा निर्माता आहेस, हिरण्य-गर्भाचा स्वामी आहेस, म्हणजेच जगाला स्वतःमध्ये धारण करणाऱ्या प्रकृतीचा स्वामी आहेस, आम्ही आपणास प्राप्त होवो.

**नि षु सीद गणपते गणेषु त्वामाहुर्विप्रतमं कवीनाम् । न ऋते त्वत्क्रियते किं चनारे महामर्कं मघवञ्चित्रमर्च ॥ (ऋक्० १० । ११२ । ९)**

हे गणपती! तुझी स्तुती करणाऱ्यांमध्ये आम्हा लोकांच्या मध्ये चांगल्या स्थानी विराजमान व्हा . क्रांतिदर्शी कवींमध्ये तुम्हाला सर्वात बुद्धिमान - सर्वज्ञ म्हटले जाते. तुमच्याशिवाय कोणतेही शुभ कार्य सुरू होत नाही. (म्हणून) हे परमेश्वरा रिद्धी-सिद्धीची अधिष्ठाता देवता प्रभु! कृपया आमची आदरणीय प्रार्थना स्वीकारा.

**गणानां त्वा गणपतिं हवामहे कविं कवीनामुपमश्रवस्तमम् ।ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आ नः शृण्वन्नूतिभिः सीद सादनम् ॥ (ऋक्० २ । २३ । १)**

हे गणपती (देव), आपल्या गणांपैकी क्रांतिदर्शी (कवी) - सर्वोत्तम कवी, ज्येष्ठराज, महान उपभोग आणि आनंद देणारा इ. आम्ही तुम्हाला आमंत्रित करतो. आमच्या स्तुतीला ऐकत आपण आमच्या पालनकर्ता रूपात या सदनात आसीन व्हावे.

**नमो गणेभ्यो गणपतिभ्यश्च वो नमो नमो व्रातेभ्यो व्रातपतिभ्यश्च वो नमो नमो गृत्सेभ्यो गृत्सपतिभ्यश्च वो नमो नमो विरूपेभ्यो विश्वरूपेभ्यश्च वो नमः ॥ (शुक्लयजु० १६ । २५)**

देवानुचर गण-विशेषज्ञ, विश्वनाथ महाकालेश्वर इत्यादी सारख्या पीठभेदाने भिन्न विविध गणपतींना, संघ, संघपती, बुद्धिशाली, बुद्धिशाल्यांचे परिपालन करणारे त्यांचे स्वामिना, दिगम्बर-परमहंस-जटिलादि चतुर्थाश्रमिना तथा सकलात्म-दर्शियांना नमस्कार असो.

**ॐ तत्कराटाय विद्महे हस्तिमुखाय धीमहि । तन्नो दन्ती प्रचोदयात् ॥ (कृ० यजुर्वेदीय मैत्रायणी० २ । ९ । १ । ६)**

त्या, कराट (सोंड फिरवीणारे ) भगवान गणपतीस आम्ही जाणतो , आम्ही गजवदनाचे ध्यान करतो, तो दंती आम्हाला तुझ्या भक्तीची प्रेरणा देईल.

**नमो व्रातपतये नमो गणपतये नमः प्रमथपतये नमस्तेऽस्तु लम्बोदरायैकदन्ताय विघ्ननाशिने शिवसुताय श्रीवरदमूर्तये नमः ॥ ( कृ० यजुर्वेदीय गणपत्यथर्वशीर्ष १०)**

व्रतपतीला नमन, गणपतीला नमन, प्रमथपतीला नमन; शिवपुत्र श्री वरदमूर्ती, जे लांब उदर, एक दात असलेले, अडथळे नष्ट करणारे आहेत त्यांना नमन.

# ꕥ गाणपत्य सांप्रदाय ꕥ

भगवान श्री गणेशाच्या उपासकांस गाणपत्य म्हणतात. मुद्गलांनी दक्षाला दिलेल्या उपदेशात देखील गाणपत्य संप्रदायाचा उल्लेख आहे. गाणपत्य संप्रदायात सहा मुख्य उपसंप्रदाय आहेत.

१. महागणपती – गणपती हाच एकमेव सृष्टीकर्ता आहे. सृष्टिप्रलयाच्या वेळी ब्रह्मादि सर्व देव नष्ट झाले तरी एकटा गणपती हाच उरतो. तो 'जगत्चालक' व 'जगत्पालक' आहे असे मानणारा पंथ.

२. हरिद्रा गणपती – या पंथियांच्या गणपतीचे सर्वांग पिवळे असते. तो पितांबर धारण करतो व यज्ञोपवीतही पिवळेच घालतो. चार हात व त्रिनेत्र असलेल्या देवतेच्या हातात पाश, अंकुश व दंड आहेत. याचे उपासक गणपतीचे तोंड व एक दात आपल्या दोन्ही दंडावर गोंदवून घेतात वा तप्तमुद्रा उठवतात.

३. उच्छिष्ट गणपती – ही उपासना वाममार्गी आहे. तांत्रिक आहे. नाथपंथियांमध्ये ज्याप्रमाणे वामाचार आहे व शिवाची पंच'म'काराने पूजा केली जाऊ लागली, तोच प्रकार येथे दिसतो. या गणपतीची मूर्ती शृंगारिक असते. याचे उपासक तांबडा टिळा लावतात.

४. नवनीत गणपती, ५. स्वर्ण गणपती, ६. संतान गणपती हे देखील अन्य काही पंथ असून ते श्रुतीसंमत उपासना करतात.

गणपती हाच परमात्मा असून त्यानेच हे ब्रह्मांड निर्माण केले अशी सर्व गाणपत्यांची दृढ श्रद्धा असते.

# ❀ श्री गणेश पुराणोक्त भगवंत अवतार कथा

**⁕ श्री मयुरेश्वराची कथा ⁕**

फार प्राचीन काळी गंडकी नगरीत चक्रपाणी नावाचा एक थोर राजा राज्य करीत होता. त्याला सूर्याच्या उपासनेने एक पुत्र झाला. त्याचे नाव सिंधू. सिंधुनेही सूर्याची उपासना करून अमरत्वाचा वर मिळवला. त्यामुळे सिंधू उन्मत्त झाला. अवघ्या त्रैलोक्याचे राज्य आपणास मिळावे असे त्याला वाटले. मग त्याने पृथ्वी जिंकली. इंद्राच्या अमरावतीवर त्याने स्वारी केली. इंद्राचा अगदी सहज पराभव केला. त्याने स्वर्ग व्यापला; तेव्हा विष्णूने त्याच्याशी युद्‌ध सुरु केले. पण विष्णूलाही सिंधूचा पराभव करता येईना. सिंधूने आपल्या अतुल पराक्रमाने विष्णूला वश केले व त्याला गंडकी नगरीत राहण्याची आज्ञा केली. मग सिंधूने सत्यलोक व कैलास यांवरही स्वारी करण्याचे ठरवले. सर्व देवांना त्याने गंडकी नगरीत बंदिवासात टाकले. तेव्हा दुःखी झालेल्या देवांनी गणेशाची आराधना सुरु केली. प्रसन्न झालेल्या गणेशाने देवांना आश्वासन दिले. मीलवकरचपार्वतीच्या पोटी मयुरेश्वर या नावाने अवतार घेईन व तुमची सिंधूच्या जाचातून सुटका करीन.

सिंधूच्या त्रासाला कंटाळलेले शंकर पार्वतीसह मेरूपर्वतावर राहत होते. पुढे भाद्रपद शुद्‌ध चतुर्थीला पार्वती गणेश पूजन करीत असता ती गणेशमूर्ती सजीव झाली. ती बालकाचे रूप घेऊन पार्वतीला म्हणाली, ``आई, मी तुझा पुत्र होऊन आलो आहे.` याच वेळी गंडकी नगरीत आकाशवाणी झाली, `सिंधुराजा, तुझ्या नाशासाठी अवतार झाला आहे.``

गणेशाचे व सिंधूचे प्रचंड युद्‌ध झाले. गणेश एका प्रचंड मोरावर बसून युद्‌ध करू लागला. त्याने कमलासुराचा वध केला. कमलासुराच्या शरीराचे तीन तुकडे तीन दिशांना फेकले. कमलासुराच्या मस्तकाचा भाग जेथे पडला ते ठिकाण म्हणजेच मोरगाव क्षेत्र. मग गणेशाने सिंधू राजाचा पराभव केला व सर्व देवांची मुक्तता केली. तेथेच गणेश भक्तांनी विनायकाच्या मूर्तीची स्थापना केली. मोरावर बसून गणेशाने दैत्यसंहार केला, म्हणून त्याला मयुरेश्वर किंवा मोरेश्वर म्हणतात व त्या स्थानाला मोरगाव असे नाव मिळाले.

## * श्री सिद्धिविनायकाची कथा *

सिद्धटेक हे स्थान भीमा नदीच्या काठावर आहे. या स्थानाला सिद्धटेक असे का म्हणतात व येथील गणेशाला सिद्धिविनायक असे नाव का पडले यासंबंधी एक पौराणिक कथा आहे ती अशी..

फार प्राचीन काळी, एकदा ब्रह्मदेवाला वाटले, आपण सृष्टीरचना करावी. यासाठी त्याने गणेशाच्या आज्ञेनुसार तपश्चर्या सुरु केली. गणेशाने त्याला एकाक्षरमंत्राचा जप दिला होता. ब्रह्मदेवाच्या उग्र तपश्चर्येने गणेश प्रसन्न झाला व 'तुझ्या सर्व मनःकामना पूर्ण होतील' असा ब्रह्मदेवाला त्याने वर दिला. मग ब्रह्मदेवाने सारी सृष्टी निर्माण केली. त्या वेळी क्षीरसागरात गाढ झोपलेल्या भगवान विष्णूच्या कानातून मधु व कैटभ हे दोन राक्षस निर्माण झाले. त्यांनी ब्रह्मदेवास त्रास देण्यास सुरुवात केली. सारी पृथ्वी भयभीत झाली. तेव्हा सर्व देवांनी भगवान विष्णूला जागे केले. विष्णूचे व मधु-कैटभांचे घनघोर युद्ध झाले. पाच हजार वर्षे युद्ध चालले, तरी विष्णू त्या दैत्यांना मारू शकला नाही; म्हणून तो शंकराकडे गेला. युद्धारंभी तू गणेशाचे स्तवन केले नाहीस, म्हणून तुला विजय मिळत नाही, असे शंकर म्हणाले. तेव्हा विष्णू एका पवित्र टेकडीवर आला. तेथे त्याने 'श्रीगणेशाय नमः' या षडाक्षर मंत्राने गणेशाची आराधना केली. त्या तपश्चर्येने विनायक (गणेश) प्रसन्न झाला. विनायकाच्या कृपेने विष्णूला सिध्दी प्राप्त झाली. मग त्याने मधु-कैटभांना ठार केले. विष्णूला विनायक ज्या ठिकाणी प्रसन्न झाला व ज्या ठिकाणी सिध्दी प्राप्त झाली, त्या ठिकाणी विष्णूने एक मोठे मंदिर बांधले व त्यात गंडकीशिलेची विनायकाची मूर्ती स्थापन केली. या ठिकाणी विष्णूची कार्यसिद्धी झाली, म्हणून या स्थानाला सिद्धटेक असे म्हणतात व येथील विनायकाला 'श्रीसिद्धिविनायक' असे म्हणतात. या वेळेपासून सिद्धटेक हे स्थान गणेशाचे पवित्र तीर्थक्षेत्र म्हणून ओळखले जाते.

कालांतराने ते मंदिर नष्ट झाले. पुढे एका गुराख्याला या टेकडीवर विनायकाने दृष्टांत दिला. तो गुराखी रोज भीमा नदीच्या पाण्याने गणेशाला स्नान घालीत असे व आपल्या शिदोरीचा नैवेद्य दाखवीत असे. तेव्हा गणेशाने त्याला सांगितले. तू स्वतः माझी पूजा न

करता एखाद्या ब्राह्मणाकरवी कर. तेव्हा त्याने पुरोहित नावाच्या ब्राह्मणाकडून श्रींची पूजा सुरु केली. पुढे पेशवे काळात येथे मंदिर बांधण्यात आले, अशी एक आख्यायिका आहे.

**❋ श्री बल्लाळेश्वराची कथा ❋**

पूर्वी पाली हे गाव `पल्लीपूर' या नावाने ओळखले जात होते. येथे कल्याण नावाचा व्यापारी राहत होता. त्याचा मुलगा बल्लाळ हा गणेशभक्त होता. तो रोज आपल्या बरोबरीच्या मुलांना घेऊन जवळच असलेल्या जंगलात जात असे. तेथे तो एका शिळेचे गणेशरूप म्हणून पूजन करीत असे. बल्लाळाने दिवसरात्र गणेशाच्या भक्तीत तल्लीन राहणे कल्याण यांना मान्य नव्हते. एकदा त्यांनी बल्लाळाला बेदम मारले आणि झाडाला बांधून निघून गेले. शरीरावर जखमा झाल्या असल्या, तरी बल्लाळाने गणेशाचे नाव घेणे सोडले नाही. त्याची भक्ती पाहून गणेश विप्र रूपात तेथे आले. त्यांनी बल्लाळाला सोडविले. बल्लाळाने आपल्या आराध्याला ओळखले आणि भक्तांचे दुःख दूर करण्यासाठी, त्यांना सत्याचा मार्ग दाखविण्यासाठी तेथेच राहण्याची विनंती केली. गणेशानेही ती विनंती मान्य करून अंशरूपाने तेथे वास्तव्य केले.

**❋ श्री वरद विनायकाची कथा ❋**

फार प्राचीन काळी भीम नावाचा एक शूर व दानी राजा होऊन गेला. त्याला मूलबाळ नसल्याने तो दुःखी होता. तेव्हा तो आपल्या राणीसह अरण्यात गेला. त्याचे दुःख जाणून विश्वामित्र ऋषींनी त्याला एकाक्षर मंत्राचा जप दिला. मग राजाने उग्र तपश्चर्या सुरु केली. त्यामुळे विनायक त्याच्यावर प्रसन्न झाला. ``तुला लवकरच पुत्रप्राप्ती होईल'' असा त्याने राजाला वर दिला.

काही दिवसांनी राजाला एक पुत्र झाला. त्याचे नाव रुक्मांगद. रुक्मांगद मोठा झाल्यावर राजाने सारा राज्यकारभार त्याच्यावर सोपविला व त्यालाही एकाक्षर मंत्राचा जप करण्यास सांगितले.

एकदा रुक्मांगद शिकारीसाठी वनात भटकत असता तो वाचक्नवी ऋषींच्या आश्रमात गेला. त्या ऋषीच्या पत्नीचे नाव होते मुकुंदा. रुक्मांगदाला पाणी देताना मुकुंदा त्याच्यावर अनुरुक्त झाली, पण रुक्मांगदाने तिची इच्छा पूर्ण केली नाही. त्यामुळे कामविव्हल झालेल्या मुकुंदेने 'तू कुष्ठरोगी होशील' असा रुक्मांगदाला शाप दिला.

शाप मिळता क्षणीच सुवर्णाप्रमाणे कांती असलेले रुक्मांगदाचे शरीर कुष्ठरोगाने विद्रूप झाले. त्यामुळे दुःखी झालेला रुक्मांगद अरण्यात भटकत असता त्याला नारदमुनी भेटले. त्यांच्या आदेशानुसार रुक्मांगदाने कदंब नगरातील कदंब तीर्थात स्नान केले व तेथील चिंतामणी गणेशाची आराधना केली. त्यामुळे रुक्मांगद रोगमुक्त झाला.

इकडे त्या मुकुंदेची अवस्था लक्षात घेऊन इंद्राने रुक्मांगदाचे रूप घेतले व मुकुंदेची इच्छा पूर्ण केली. त्याच्यापासून मुकुंदेला पुत्र झाला. त्याचे नव गृत्समद. हाच तो ऋग्वेदातील प्रसिध्द मंत्रदृष्टा व द्वितीय मंडळाचा करता. गृत्समदाच्या जन्माची कथा सर्वांना माहित झाली होती. त्यामुळे त्याचा पदोपदी पाणउतारा होऊ लागला. मातेच्या पापाचरणामुळे सर्वजण गृत्समदाला हीन लेखू लागले. तेव्हा गृत्समदाने आईकडून सत्य जाणून घेतले व तिला शाप दिला. मग तो पापक्षालनार्थ पुष्पक (भद्रक) वनात तप करू लागला. त्याने विनायकाची आराधना केली. त्यामुळे विनायक प्रसन्न झाला. विनायकाने त्याला वर मागण्यास सांगितले. तेव्हा तो म्हणाला, ''तू याच वनात वास्तव्य करून भक्तांच्या इच्छा पूर्ण कर.'' विनायकाने ते मान्य केले व त्या वनात राहू लागला. ते पुष्पक किंवा भद्रक वन म्हणजेच आजचे महाड क्षेत्र. या ठिकाणी गृत्समदाला वर मिळाला म्हणून येथील विनायकाला 'वरद विनायक' म्हणतात. गृत्समद हा गाणपत्य संप्रदायाचा आद्य प्रवर्तक समजला जातो.

## ❋ श्री चिंतामणीची कथा ❋

फार प्राचीन काळी अभिजित नावाचा एक राजा होता. त्याच्या पत्नीचे नाव गुणवती. सारे काही व्यवस्थित होते, पण राजाला पुत्रसंतान नव्हते. मग वैशंपायन नावाच्या ऋषीच्या आदेशानुसार राजा-राणीने वनात जाऊन तपश्चर्या केली. पुढे कालांतराने गुणवंतीला एक पुत्र झाला. त्याचे नाव ठेवले गण. गण मोठा पराक्रमी होता, पण तितकाच तापट होता. एकदा तो कपिल मुनींच्या आश्रमात गेला. कपिलांच्याजवळ चिंतामणी रत्न होते. त्या रत्नाच्या सामर्थ्याने कपिलने गणला भोजन घातले. गणराजाला ते रत्न हवे होते, पण कपिलाने ते देण्यास नकार दिला. तेव्हा गणराजाने ते हिरावून नेले; कपिलाला फार वाईट वाटले. मग त्याने दुर्गादेवीच्या आज्ञेनुसार विनायकाची आराधना केली. विनायक प्रसन्न झाला व त्याचे गेलेले रत्न परत मिळवून देण्याचे त्याने कपिलाला वचन दिले.

पुढे विनायकाचे व गणराजाचे घनघोर युद्ध झाले. विनायकाने गणराजाला ठार मारले. तेव्हा त्याच्या पित्याने अभिजीताने ते चिंतामणी रत्न विनायकास परत दिले. विनायकाने ते कपिलाला परत दिले, पण कपिलाने ते स्वीकारले नाही. तेव्हा विनायकाने चिंतामणी नाव धारण केले व ज्या कदंब वृक्षाखाली ही घटना घडली तेथेच तो वास्तव्य करू लागला, तो आजतागायत. पुढे त्या कदंब वृक्षाच्या सभोवती एक गाव वसले. त्याचे नव कदंबनगर. ते पुढे कदंबतीर्थ म्हणून प्रसिद्ध झाले. हे कदंबतीर्थ म्हणजेच सध्याचे थेऊर व तेथील विनायक तो चिंतामणी विनायक.

अहिल्येचा अपहार केल्याबद्दल इंद्राला गौतमाने शाप दिला असता गौतमाच्याच आदेशाने इंद्राने तपश्चर्या केली व तो शापमुक्त झाला. त्याचे शरीर पूर्वीप्रमाणेच सतेज झाले. इंद्राने ज्या ठिकाणी बसून तप केले व शापमुक्त झाला त्या ठिकाणी त्याने श्रीगणेशाची स्थापना केली व तेथील सरोवरास `चिंतामणी` असे नाव दिले. तेच हे क्षेत्र.

ब्रह्मदेवाने आपल्या चंचल मनाला स्थिरता लाभावी, ते शांत व्हावे म्हणून श्रीगणेशाचे चिंतन व अनुष्ठान केले. त्यामुळे ब्रह्मदेवाच्या मनाची चंचल वृत्ती नाहीशी झाली. ही सिद्धी त्याला ज्या ठिकाणी प्राप्त झाली त्याला त्याने स्थावर क्षेत्र असे नाव दिले व तेथे `चिंतामणी` गणेशाची स्थापना केली म्हणून या क्षेत्राला थेऊर असे नाव प्राप्त झाले.

**✻ श्री गिरिजात्मजाची कथा ✻**

आपल्याला गजानन पुत्र व्हावा या इच्छेने पार्वतीने लेण्याद्रि पर्वताच्या गुहेत १२ वर्षे तपश्चर्या केली. तिच्या तपश्चर्येने गजानन प्रसन्न झाला. तुझ्या इच्छेप्रमाणे मी तुझा पुत्र होईन, तुझे व लोकांचे मनोरथ पूर्ण करीन, असा त्याने पार्वतीला वर दिला. भाद्रपद चतुर्थीला पार्वतीने गजाननाच्या पार्थिव मूर्तीची पूजा केली. ती मूर्ती सचेतन होऊन पार्वतीपुढे पुत्र रूपाने प्रकट झाली. त्या बालकाला सहा हात, तीन नेत्र व सुंदर शरीर होते.

गिरिजात्मज गणेशाने १२ वर्षे या क्षेत्रात तप केले. अत्यंत बाल्यावस्थेतच मोठमोठ्या दैत्यांचा संहार केला व सर्वांची जाचातून सुटका केली. याच प्रदेशात गौतममुनींनी गणेशाची मुंज केली. याच प्रदेशात गणेशाचा 'मयुरेश्वर' अवतार झाला असे म्हणतात. गिरिजात्मज गणेशाने या प्रदेशात सुमारे १५ वर्षे वास्तव्य केले होते. त्यामुळे हे क्षेत्र अत्यंत पवित्र मानले जाते.

**✻ श्री विघ्नेश्वराची कथा ✻**

फार प्राचीन काळी हैमवती नगरीत अभिनंदन नावाचा एक राजा राज्य करीत होता. आपल्याला इंद्रपद प्राप्त व्हावे असे त्याला वाटू लागले. ही वार्ता स्वर्गातील इंद्राला नारदमुनींकडून समजली. तो घाबरला. त्याने अभिनंदनाच्या यज्ञात विघ्न आणण्यासाठी काळाचे स्मरण केले. त्याच क्षणी अक्राळ-विक्राळ रूप धारण करून काळ प्रकट झाला. त्याला इंद्राने आज्ञा केली, 'अभिनंदनाच्या यज्ञात विघ्ने निर्माण कर, त्याच्या यज्ञाचा विध्वंस कर.' त्याने आज्ञा मिळताच अभिनंदनाच्या यज्ञाचा विध्वंस केला असे नव्हे, तर पृथ्वीवरील सर्वच वैदिक कर्मांचा नाश केला. धर्माचा लोप झाला. देवांवर हे मोठेच संकट आले. तेव्हा सर्व देवांनी गजाननाची आराधना केली. त्या वेळी गजानन पाराशर मुनींच्या आश्रमात राहत होता. देवांच्या आराधनेने गजानन प्रसन्न झाला. 'मी त्या विघ्नासुराचा बंदोबस्त करतो' असे त्याने देवांना आश्वासन दिले.

मग गजाननाने पाराशरपुत्र होऊन विघ्नासुराशी प्रचंड युद्ध केले. गजाननाच्या प्रचंड

शक्तीपुढे विघ्नासुराचे काही चालेना. तो शरण गेला. गजाननाने त्याला आज्ञा केली, `ज्या ठिकाणी माझे भजन-पूजन-कीर्तन चालू असेल तेथे तू जाता कामा नये.` मग विघ्नासुराने गजाननाला वर मागितला, `तुमच्या नावामागे माझे नाव असावे. `विघ्नहर` किंवा `विघ्नेश्वर` असे नाव धारण करून या क्षेत्री वास्तव्य करावे.` तथास्तु` असे म्हणून गजानन म्हणाला, ``मी आजपासून `विघ्नेश्वर` झालो आहे. मी तुला माझ्या गणसमुदायात घेतले आहे. `विघ्नेश्वर` या नावाने जे कोणी जप करतील त्यांना सर्व सिद्धी प्राप्त होतील.``

अशा प्रकारे विघ्नासुराचा पराभव केला; म्हणून गजाननास `विघ्नेश्वर`` किंवा `विघ्नहर` असे नाव या स्थानी प्राप्त झाले. मग भाद्रपद शुद्ध चतुर्थीला मध्यान्हकाळी देवांनी नैरुत्य दिशेला विघ्नेश्वर गजाननाची स्थापना केली. ही घटना ओझर येथे घडली. हाच तो ओझरचा `श्री विघ्नेश्वर विनायक` .

**❃ श्री महागणपतीची कथा ❃**

फार प्राचीन काळी गृत्समद नावाचा एक थोर ज्ञानी अनेक विद्यांत पंडित असा ऋषी होऊन गेला. तो थोर गणेशभक्त होता. एकदा त्याच्या शिंकेतून एक लाल रंगाचा मुलगा बाहेर आला. गृत्समदाने त्याला आपले पुत्र मानले. `मी मोठा झाल्यावर त्रैलोक्य पादाक्रांत करून इंद्रालाही जिंकेन` असे तो मुलगा म्हणाला. मग गृत्समदाने त्याला `गणानां त्वा` या गणेशमंत्राचा उपदेश केला. त्या मुलाने वनात जाऊन गणेशाची आराधना केली. गणेशाने प्रसन्न होऊन त्याला प्रचंड सामर्थ्याचा वर दिला. त्याच प्रमाणे त्याला लोखंड, रूपे व सुवर्ण यांची तीन नगरेही दिली. `या त्रिपुरांचा नाश भगवान शिवशिवाय कोणीही करणार नाही. भगवान शिव एकाच बाणाने या त्रिपुरांचा संहार करील व तुलाही मुक्ती मिळेल` असा वर गणेशाने दिला म्हणून तो मुलगा त्रिपुरासुर या नावाने प्रसिद्ध झाला.

गणेशाने दिलेल्या वरामुळे त्रिपुरासुर उन्मत्त झाला. त्याने अवघ्या त्रैलोक्याला त्राही

भगवन करून सोडले. त्याने सर्व देवांनाही जिंकले. तेव्हा सर्व देव भगवान शिवाला शरण गेले. त्रिपुरासुराचा वध करण्याचे शंकराने आश्वासन दिले. मग भगवान शिव त्रिपुरासुराच्या वधासाठी मंदार पर्वतावर आले. त्रिपुरासुराचे व शिवाचे घनघोर युद्ध झाले; पण शिवाला त्रिपुरासुर आवरेना. तेव्हा नारदांनी त्यांना भेटून सांगितले की, 'युद्धारंभी आपण विघ्नहारी गणेशाचे स्मरण केले नाही' म्हणून विजय मिळाला नाही. मग नारदांनी शंकराला 'प्रणम्य शिरसा देव' हे प्रसिद्ध अष्टश्लोकात्मक स्तोत्र सांगितले. शंकरांनी त्या स्तोत्राने गणेशाची आराधना केली असता त्यांच्या मुखातून एक उग्र पुरुष बाहेर पडला व 'मीच गणेश' असे सांगून वर मागण्यास सांगितले. त्रिपुरासुरावर विजय मिळावा असा वर शिवाने मागितला. तेव्हा गणेशाने प्रकट होऊन वर दिला व या स्थानाला लोक मणिपूर (रांजणगाव) म्हणतील असे सांगून गणेश अदृश्य झाला.

मग शिवाचे व त्रिपुरासुराचे प्रचंड युद्ध झाले व शेवटी शंकरांनी एकाच बाणाने त्रिपुरांचा व त्रिपुरासुराचा नाश केला. ही घटना कार्तिक शुद्ध पौर्णिमेला घडली; म्हणून या पौर्णिमेला त्रिपुरी पौर्णिमा असे म्हणतात. त्रिपुरासुराबरोबरील युद्धात यश मिळावे म्हणून भगवान शंकराने या ठिकाणी श्री महागणपतीच्या मूर्तीची स्थापना व आराधना केली; तोच हा मणिपूरचा रांजणगावचा श्री महागणपती .

# ❈ बृहद जन्मपत्रिका ❈

नमस्कार 🙏 आम्ही आपणासाठी घेऊन आलो आहोत 'बृहद जन्मकुंडली' विस्तृत, अचूक व आकर्षक रंगीत मेगाकुंडली. आपणही आजच आपली विस्तृत जन्मकुंडली प्राप्त करा.

🔅 ✻जन्म विवरण✻

🔅 ✻पंचांग✻

🔅 ✻अवकहडा चक्र✻

🔅 ✻अनुकूल चक्र✻

🔅 ✻घात चक्र✻

🔅 ✻लग्न कुंडली✻

🔅 ✻नवमांश कुंडली✻

🔅 ✻लग्न✻

🔅 ✻नक्षत्र फळ✻

🔅 ✻अंक ज्योतिष✻

🔅 ✻चंद्र राशी✻

🔅 ✻जीवन अनुमान✻ ✻(भविष्यवाणी)✻

🔅 ✻मंगळ दोष✻

🔅 ✻कालसर्प दोष✻ ✻(विश्लेषण व निवारणेसह)✻

🔅 ✻पितृ दोष✻

🔅 ✻शनी साडेसाती अहवाल✻

🔅 ✼शनी साडेसाती कोष्टक✼

🔅 ✼विंशमोत्तरी महादशा✼

🔅 ✼विंशमोत्तरी महादशा फळ✼

🔅 ✼जैमिनी पध्दती कुंडली✼ ✼(स्वांश व कारकांश)✼

🔅 ✼ग्रह विचार :✼ ✼(तुमच्या कुंडलीतील नवग्रहांचे स्थान व त्यांचे तुमच्या भविष्यावर होणारे परिणाम)✼

🔅 ✼अनिष्ट ग्रह बाधा निवारण✼

🔅 ✼रत्न मार्गदर्शन✼

🔅 ✼भाग्य रत्न✼

🔅 ✼जीवन रत्न✼

🔅 ✼कारक रत्न✼

🔅 ✼रुद्राक्ष परामर्श✼

🔅 ✼तुम्हाला जन्मकुंडली प्रमाणे अनुकूल उपासना✼

🔅 ✼आणखी बरेच काही...✼

**अत्यंत अल्प शुल्क..!**

**आताच संपर्क साधा : तथास्तु ज्योतिष आळंदी देवाची**

**कॉल करा किंवा व्हाट्सऍप मेसेज करा : ८१४९४२३५२३**

# ❀ श्री मुद्गल पुराणोक्त भगवंत अवतार कथा

**✻ वक्रतुंड अवतार कथा ✻**

देवराज इंद्राच्या प्रमादा पासून महान असून मत्सरासुराचा जन्म झाला. त्याने नंतर भगवान शंकराची तपश्चर्या केली आणि त्रैलोक्यात कोणापासूनही भय नसण्याचा वर मिळविला. त्यानंतर त्याने स्वर्ग, पाताळ, पृथ्वी जिंकून घेतले. एवढेच नाही तर शंकरांकडून कैलास व विष्णूकडून वैकुंठ देखील जिंकून घेतला.

त्यानंतर सर्व देवतांनी मिळून भगवान श्री वक्रतुंडाची आराधना केली. त्या आराधनेने संतुष्ट होऊन भगवान श्रीवक्रतुंडाने त्यांना दर्शन दिले आणि मसरासुराच्या वधाचा वर दिला.

त्यानंतर भगवान वक्रतुंड यांनी आपल्या स्मरण मात्राने असंख्य गणांना उत्पन्न केले व भगवान वक्रतुंड मत्सरासुराशी युद्धास निघाले पाच दिवसांपर्यंत ते भयानक युद्ध सुरू होते त्या युद्धात मत्सरासुराचे दोन पुत्र सुंदरप्रिय आणि विषयप्रिय मारले गेले. पुत्र वधाने व्याकुळ झालेला तो असुर वक्रतुंडाशी युद्ध करण्याच्या हेतूने रणांगणी आला. त्याला पाहता भगवान वक्रतुंड उच्च स्वरात म्हणाले, "दृष्ट असुर जर तुला तुझे प्राणप्रिय आहे तर मला शरण ये नाहीतर तू माझ्या हातून निश्चितच मारल्या जाशील."

पुत्र वधाने आहत आणि भगवान वक्रतुंडाच्या भयाने आक्रांत झालेला मत्सरासुर विनम्र भावाने भगवंतास शरण गेला आणि स्तुती करू लागला. वक्रतुंड यांनी सर्व देवांना त्यांच्या स्वस्थानी परत प्रतिष्ठित केले आणि मत्सरासुरास व सर्व देवांस आपली भक्ति प्रदान करून भगवंत स्वलोकी गमन करते झाले.

**✻ एकदंत अवतार ✻**

महर्षी च्यवनाने मदाची सृष्टी केली. हा मद असुर नंतर शुक्राचार्यांकडे गेला आणि मला ब्रह्मांडाचे महान राज्य पाहिजे असे आपले इप्सित सांगितले. शुक्राचार्यांनी त्याला शक्तीची (देवीची) उपासना करण्यास सांगितले.

मदासुराच्या अतिउग्र तपाने देवी भगवती प्रसन्न झाली आणि तिने त्याला त्याचा इच्छित वर दिला. त्यानंतर मदासुराने त्रैलोक्य जिंकले. शिव, विष्णु, ब्रह्मा, शक्ती हे देवता ही स्थानभ्रष्ट झाले. चिंतित देवगन सनत्कुमारांजवळ गेले सनत्कुमारांनी त्या सर्वांस भगवान एकदंताची उपासना करण्यास सांगितले. सर्व देवतांनी मिळून भगवान श्री एकदंतांची उपासना केली भगवान प्रसन्न झाले आणि मदासुराच्या वधाचा वर देते झाले.

त्यानंतर भगवान एकदंतानी मदासुराशी युद्ध केले. मदासुर भगवंतास शरण आला आणि हात जोडून भगवंताची स्तुती करू लागला. भगवंताने त्यास सांगितले, "जेथे माझी पूजा होते तेथे तू कधी जाऊ नकोस याच्या विपरीत आसुरी भावाच्या कर्मांचे फळ तू भक्षण करत रहा." भगवंताने त्यास त्याच्या म्हणण्यानुसार आपली दृढ भक्ती देखील प्रदान केली. भगवंताकडून भक्तीचा वर प्राप्त करून मदासुर पाताळी गेला.

**✻ महोदर अवतार ✻**

तारक नामक अत्यंत दारुण असुर होता त्याने ब्रह्मदेवाच्या वरदानाच्या प्रभावाने संपूर्ण त्रैलोक्य जिंकले. त्याच्या त्रासापासून पीडित देवता आणि मुनी यांनी शिव आणि पार्वतीचे ध्यान केले. शंकर समाधीस्थ असल्याने पार्वती भील्लनीचे रूप घेऊन शंकरा समिप गेली. शंकरांनी पार्वतीला खूप ध्यानपूर्वक बघितलेच होते की, ती अदृश्य झाली. तेव्हा शिवाच्या द्वारा अत्यंत उग्र महान पुरूष मोह उत्पन्न झाला. ध्यानाने पार्वतीची लीला समजून भगवान शंकराने कुपित होऊन काम देवास दग्ध केले. शाप मुक्त होण्यासाठी काम देवाने महोदर तपश्चर्या केली. प्रसन्न महोदर बोलले मी शिवाच्या शापास विफळ जाऊ देणार नाही. मी तुला रहण्यासाठी अन्य देह देत आहे. महोदर

म्हणाले, महामते आजपासून यौवन, नारी आणि पुष्प तुझे सुंदर वास स्थान आहे. गाण, मकरंद रस पक्ष्यांचे मधुर स्वर, उद्यान वसंत आणि चंदनादि तुझे सुंदर आवास आहेत. तसेच इतरही वर्णन करून भगवंताने काम देवास मनोभू : व स्मृतीभू: आदि नाव प्रदान केले. परंतु काम देवाच्या दयामय प्रार्थने वरुन भगवान गणेशाने त्यास पुन्हा सांगितले श्रीकृष्णाचा अवतार झाल्यावर तू त्याचा पुत्र प्रद्युम्न होशील.

इकडे मोहासुराने सूर्याचे तपाने सर्वत्र विजयी होण्याचा वर मिळविला. त्यानंतर त्याने त्रैलोक्यावर भयानक अत्याचार करण्यास सुरुवात केली. त्याच्या त्रासापासून मुक्तते साठी सर्व देवतांनी भगवान श्री महोदराची उपासना केली आणि प्रसन्न महोदराने सांगितले मी मोहासुराचा वध करेल.

परंतु भगवान महोदर माझ्या नाशार्थ युद्धासाठी आलेलं कळताच मोहासुर भगवंतास विनम्र भावाने शरण गेला. भगवंताचे उत्तम आतिथ्य सत्कार करुण त्याने गदगद कंठाने भगवंताची स्तुती केली.

सहज कृपाळू महोदराने त्याला आपली दुर्लभ भक्ति प्रदान केली. मोहासुर शांत झाल्याने सर्व स्त्री-पुरुष, ऋषी-मुनी, देवता सुखी झाल्या. सर्व महोदराचा जय-जयकार करायला लागले.

**✻ गजानन अवतार ✻**

एकदा धनाधीपती कुबेर कैलासावर गेले. तेथे त्यांनी शंकर आणि पार्वतीचे दर्शन केले. अमित सौन्दर्य शालिनी परम सती पार्वती कुबेराला स्वतःकडे लुब्ध दृष्टीने बघताना पाहून प्रचंड कुपीत झाली. पार्वतीचा कोप बघून कुबेर खूप घाबरला त्याच भयभीत कुबेरा पासून लोभासुर उत्पन्न झाला.

निर्जन अरण्यात जाऊन लोभासुराने भगवान शिवाची तपश्चर्या केली आणि त्यांच्याकडून विविध वर मिळवले. त्यानंतर त्याने स्वर्ग,पृथ्वी, पाताळ एवढेच नाही तर वैकुंठ आणि

कैलास देखील जिंकले. असुर महान वर प्राप्त असल्याने त्याच्या समोर शिव आणि विष्णू या देवतांचा देखील टिकाव लागला नाही.

त्यानंतर सर्व पीडित देवतांनी श्री गणेश उपासना केली. प्रसन्न होऊन मूषक आरूढ भगवान श्री गजानन प्रकट झाले आणि लोभासुराला मी पराजित करेन असे सांगितले.

भगवान श्री गजाननाने शंकरास दूत म्हणून लोभासुरापाशी पाठविले. शिवाने लोभासुरास गजानन महात्म्य ऐकवले त्याचे गुरू शुक्राचार्य यांनी देखील त्याला गजाननाच्या शरणात जा आणि शांतीपूर्ण जीवन व्यतीत कर असाच सल्ला दिला. लोभासुराने गणेश तत्त्व समजून घेतले आणि तो परम प्रभूच्या चरणांचे वंदन करता झाला.

शरणागतवत्सल गजाननाने त्याला सांत्वना दिली. देवता, मुनी, ब्राह्मण सर्व सुखी झाले. सर्वजण श्री गजाननाचे गुणगान करू लागले.

## ❋ लंबोदर अवतार ❋

श्रीविष्णूच्या महा मोहप्रद अनुपम अशा मोहिनी रूपास बघून भगवान शंकर अत्यंत कामविव्हल झाले. त्यावर हसत श्री विष्णूंनी मोहिनी रूपाचा त्याग केला, शंकर खिन्न झाले. परंतु त्यांचे वीर्य स्खलित झाले. त्यापासून एक परम शक्तिसंपन्न असुर उत्पन्न झाला.

त्या असुराला शुक्राचार्यांनी क्रोधासुर असे नाव दिले. त्याने भगवान सूर्याचे तप करुण कधीही मृत्यू न होण्याचा व संपूर्ण ब्रम्हांडावर विजयाचा वर प्राप्त केला.

त्याने नंतर स्वर्ग, पृथ्वी, पाताळ, सुर्यलोक, वैकुंठ व कैलास हे सर्व लोक जिंकले. सर्व ब्रह्मांडास त्याने आपल्या अत्याचाराने हादरून सोडले.

अत्यंत दुःखित सर्व देवतांनी भगवान श्री गणेशांची आराधना केली. संतुष्ट होऊन भगवान श्री लम्बोदर प्रकट झाले आणि म्हणाले मी क्रोधाराच्या अहंकाराचे चुरणा करुणा त्यास नष्ट करेल. तुम्ही सर्व निश्चिंत व्हा.

भगवान श्री लम्बोदर क्रोधासुराचा सोबत युद्धास निघाले. रणांगणी क्रोधासुराने भगवान लंबोदरांस पाहून त्यांची निर्भत्सना सुरू केली. परंतु दयानिधी भगवंताने क्रोधासुराचा सर्व शंकांचे निरसन केले त्यानंतर क्रोधासुर भगवान श्री लम्बोदरासस शरण आला व लंबोदराच्या आज्ञेने पाताळी गेला.

**✻ विघ्नराज अवतार ✻**

एकदा देवी पार्वती आपल्या सख्यांसह कैलास पर्वतावर फिरत होत्या. तेव्हा त्यांच्यात हशा पिकला. त्याच्या हास्यातून एक विशाल पुरुष जन्माला आला आणि त्यांनी त्याचे नाव `मम` ठेवले. मम तपश्चर्या करण्यासाठी जंगलात गेला, तिथे त्याला शंबासुर भेटला. शंबासुराने ममला अनेक आसुरी शक्ती प्रदान केल्या. यानंतर ममने गणेशाला प्रसन्न केले आणि विश्वाचे रहस्य विचारले. शुक्राचार्यांना याची माहिती मिळाल्यावर त्यांनी ममला राक्षसराजाचे पद दिले. पद मिळाल्यावर ममाने देवतांना पकडून तुरुंगात टाकले. त्यानंतर देवतांनी गणेशाचे आवाहन केले आणि त्यांना समस्यांची जाणीव करून दिली. भगवान गणेशाने विघ्नराज अवतार घेतला आणि मग ममासुराचा वध करून सर्व देवतांची तुरुंगातून सुटका केली.

**✻ धूम्रवर्ण अवतार ✻**

एकदा ब्रह्माजींनी सूर्यदेवाला कर्माच्या राज्याचा स्वामी बनवले. यानंतर सूर्याला गर्व झाला. राज्य करत असताना सूर्यदेवाला शिंक आली, त्यातून राक्षसाचा जन्म झाला. शिंकापासून जन्मलेल्या राक्षसाचे नाव अहम होते. अहम राक्षस गुरु

शुक्राचार्यांकडे गेला आणि तो अहंतासुर झाला. यानंतर त्यांनी स्वतःचे राज्यही बनवले आणि गणेशाची पूजा करून वरदान मिळवले. वरदान मिळाल्यावर अहंतासुराने देवतांचा

छळ सुरू केला. सर्वांनी गणेशाची आराधना केली. देवांच्या आवाहनानंतर गणेशाने धुर्मवर्णाचा अवतार घेतला. ते स्वरुप खूप भयानक होते.

त्याच्या एका हातात एक भयंकर पाश होता, ज्यातून भयंकर ज्वाला निघत होत्या. धुर्मवर्णाने अहंतासुराचा वध करून देवांची मुक्तता केली.

## स्तोत्रे

### * श्री गणेश पंचरत्न स्तोत्र *

मुदाकरात्तमोदकं सदा विमुक्तिसाधकं

कलाधरावतंसकं विलासिलोकरक्षकम् ।

अनायकैकनायकं विनाशितेभदैत्यकं

नताशुभाशुनाशकं नमामि तं विनायकम् ॥१॥

नतेतरातिभीकरं नवोदितार्कभास्वरं

नमत्सुरारिनिर्जरं नताधिकापदुद्धरम् ।

सुरेश्वरं निधीश्वरं गजेश्वरं गणेश्वरं

महेश्वरं तमाश्रये परात्परं निरन्तरम् ॥२॥

समस्तलोकशंकरं निरस्तदैत्यकुञ्जरं

दरेतरोदरं वरं वरेभवक्त्रमक्षरम् ।

कृपाकरं क्षमाकरं मुदाकरं यशस्करं

मनस्करं नमस्कृतां नमस्करोमि भास्वरम् ॥३॥

अकिंचनार्तिमार्जनं चिरन्तनोक्तिभाजनं

पुरारिपूर्वनन्दनं सुरारिगर्वचर्वणम् ।

प्रपञ्चनाशभीषणं धनंजयादिभूषणम्

कपोलदानवारणं भजे पुराणवारणम् ॥४॥

नितान्तकान्तदन्तकान्तिमन्तकान्तकात्मजं

अचिन्त्यरूपमन्तहीनमन्तरायकृन्तनम् ।

हृदन्तरे निरन्तरं वसन्तमेव योगिनां

तमेकदन्तमेव तं विचिन्तयामि सन्ततम् ॥५॥

महागणेशपञ्चरत्नमादरेण योऽन्वहं

प्रजल्पति प्रभातके हृदि स्मरन् गणेश्वरम् ।

अरोगतामदोषतां सुसाहितीं सुपुत्रतां

समाहितायुरष्टभूतिमभ्युपैति सोऽचिरात् ॥६॥

|| संपूर्ण ||

## ❋ श्रीसिद्धिविनायकस्तोत्रं ❋

विघ्नेश विघ्नचयखण्डननामधेय

श्रीशंकरात्मज सुराधिपवन्द्यपाद ।

दुर्गामहाव्रतफलाखिलमंगलात्मन्

विघ्नं ममापहर सिद्धिविनायक त्वम् ॥१॥

सत्पद्मरागमणिवर्णशरीरकान्तिः

श्रीसिद्धिबुद्धिपरिचर्चितकुंकुमश्रीः ।

दक्षस्तने वलयितातिमनोज्ञशुण्डो

विघ्नं ममापहर सिद्धिविनायक त्वम् ॥२॥

पाशांकुशाब्जपरशूंश्च दधच्चतुर्भि-

र्दोर्भिश्च शोणकुसुमस्त्रगुमांगजातः ।

सिन्दूरशोभितललाटविधुप्रकाशो

विघ्नं ममापहर सिद्धिविनायक त्वम् ॥३॥

कार्येषु विघ्नचयभीतविरंचिमुख्यैः

सम्पूजितः सुरवरैरपि मोदकाद्यैः ।

सर्वेषु च प्रथममेव सुरेषु पूज्यो

विघ्नं ममापहर सिद्धिविनायक त्वम् ॥४॥

शीघ्रांचनस्खलनतुंगरवोर्ध्वकण्ठ-

स्थूलेन्दुरुद्रगणहासितदेवसंघः ।

शूर्पश्रुतिश्च पृथुवर्तुलतुंगतुन्दो

विघ्नं ममापहर सिद्धिविनायक त्वम् ॥५॥

यज्ञोपवीतपदलम्भितनागराजो

मासादिपुण्यददृशीकृतऋक्षराजः ।

भक्ताभयप्रद दयालय विघ्नराज

विघ्नं ममापहर सिद्धिविनायक त्वम् ॥६॥

सद्रत्नसारततिराजितसत्किरीटः

कौसुम्भचारुवसनद्वय ऊर्जितश्री:।

सर्वत्र मंगलकरस्मरणप्रतापो

विघ्नं ममापहर सिद्धिविनायक त्वम् ॥७॥

देवान्तकाद्यसुरभीतसुरार्तिहर्ता

विज्ञानबोधनवरेण तमोऽपहर्ता ।

आनन्दितत्रिभुवनेश कुमारबन्धो

विघ्नं ममापहर सिद्धिविनायक त्वम् ॥८॥

॥इति श्रीमुद्गलपुराणे विघ्ननिवारकं श्रीसिद्धिविनायकस्तोत्रं सम्पूर्णम् ॥

*** गणपति स्तोत्र ***

गणपति: विघ्नराजो लम्बतुन्ड़ो गजानन:। द्वै मातुरश्च हेरम्ब एकदंतो गणाधिप:॥ विनायक: चारूकर्ण: पशुपालो भवात्मज:। द्वादश एतानि नामानि प्रात: उत्थाय य: पठेत्॥ विश्वम तस्य भवेद् वश्यम् न च विघ्नम् भवेत् क्वचित्। विघ्नेश्वराय वरदाय शुभप्रियाय। लम्बोदराय विकटाय गजाननाय॥ नागाननाय श्रुतियज्ञविभूषिताय। गौरीसुताय गणनाथ नमो नमस्ते॥ शुक्लाम्बरधरं देवं शशिवर्णं चतुर्भुजं। प्रसन्नवदनं ध्यायेतसर्वविघ्नोपशान्तये॥

***ऋणहर्ता गणेश स्तोत्र ***

॥ ध्यान ॥

ॐ सिन्दूर–वर्णं द्वि–भुजं गणेशं लम्बोदरं पद्म–दले निविष्टम् ।

ब्रह्मादि-देवैः परि-सेव्यमानं सिद्धैर्युतं तं प्रणामि देवम् ॥

॥ मूल-पाठ ॥

सृष्ट्यादौ ब्रह्मणा सम्यक् पूजित: फल-सिद्धए ।

सदैव पार्वती-पुत्र: ऋण-नाशं करोतु मे ॥

त्रिपुरस्य वधात् पूर्वं शम्भुना सम्यगर्चित: ।

सदैव पार्वती-पुत्र: ऋण-नाशं करोतु मे ॥

हिरण्य-कश्यप्वादीनां वधार्थे विष्णुनार्चित: ।

सदैव पार्वती-पुत्र: ऋण-नाशं करोतु मे ॥

महिषस्य वधे देव्या गण-नाथ: प्रपुजित: ।

सदैव पार्वती-पुत्र: ऋण-नाशं करोतु मे ॥

तारकस्य वधात् पूर्वं कुमारेण प्रपूजित: ।

सदैव पार्वती-पुत्र: ऋण-नाशं करोतु मे ॥

भास्करेण गणेशो हि पूजितश्छवि-सिद्धए ।

सदैव पार्वती-पुत्र: ऋण-नाशं करोतु मे ॥

शशिना कान्ति-वृद्धयर्थं पूजितो गण-नायक: ।

सदैव पार्वती-पुत्र: ऋण-नाशं करोतु मे ॥

पालनाय च तपसां विश्वामित्रेण पूजित: ।

सदैव पार्वती-पुत्र: ऋण-नाशं करोतु मे ॥

इदं त्वृण-हर-स्तोत्रं तीव्र-दारिद्र्य-नाशनं,

एक-वारं पठेन्नित्यं वर्षमेकं सामहितः ।

दारिद्र्यं दारुणं त्यक्त्वा कुबेर-समतां व्रजेत् ॥

# ❁ श्री पंचश्लोकी गणेश पुराणम ❁

**⁎श्रीविघ्नेशपुराणसारमुदितं व्यासाय धात्रा पुरा।⁎**

**⁎तत्खण्डं प्रथमं महागणपतेश्चोपासनाख्यं यथा ।।⁎**

**⁎संहर्तुं त्रिपुरं शिवेन गणपस्यादौ कृतं पूजनम् ।⁎**

**⁎कर्तुं सृष्टिमिमां स्तुतः स विधिना व्यासेन बुध्याप्तये ॥ १ ॥⁎**

⁎अर्थात :⁎ पूर्वी ब्रह्माजींनी व्यासजींना श्रीविघ्नेश (गणेश) – पुराणाचे सार सांगितले होते. महागणपतीच्या पूजेच्या अर्थाचा हा पहिला खंड आहे. त्रिपुराचा नाश करण्यासाठी भगवान शिवाने प्रथम गणपतीची पूजा केली. तसेच ब्रह्माजींनी ही सृष्टी निर्माण करण्यासाठी त्यांची यथोचित स्तुती केली. त्यानंतर व्यासजींनी त्यांच्या ज्ञानप्राप्तीसाठी स्तुती केली.

**⁎संकष्ट्याश्च विनायकस्य च भवो स्थानस्य तीर्थस्य वै ।⁎**

**⁎दूर्वाणां महिमेति भक्तिचरितं तत्पार्थिवस्यार्चनम् ।।⁎**

**⁎तेभ्यो यैर्यदभीप्सितं गणपतिः तत्तत्प्रतुष्टो ददौ ।⁎**

**⁎ताः सर्वा न समर्थ एव कथितुं ब्रह्मा कुतो मानवः ॥ २ ॥⁎**

*अर्थात :* संकष्टी देवी, श्रीगणेश, त्यांचे मंत्र, स्थान, तीर्थ आणि दुर्वा यांचा महिमा भक्तचरित आहे. त्याच्या पार्थिव विग्रहाचे पूजन ही भक्ती चर्या आहे. ही भक्तीचर्या करणार्यांनी जे काही मिळावे म्हणून जी इच्छा केली भक्तीने तृप्त झालेल्या गणपतीने त्याला त्या वस्तू दिल्या. ब्रह्माजी सुद्धा त्या सर्वांचे वर्णन करू शकत नाहीत, मग मानवाची काय गोष्ट आहे.

***क्रीडाकाण्डमथो वदेत्कृतयुगे श्वेतच्छविः काश्यपः ।***

***सिंह्वाङ्कः सविनायको दशभुजो भूत्वाथ काशीं ययौ ।।***

***हत्वा तत्र नरान्तकं तदनुजं देवान्तकं दानवम् ।***

***त्रेतायां शिवनन्दनो दशभुजो जातो मयूरध्वजः ॥ ३ ॥***

*अर्थात :* आता मी क्रीडाकांडाचे वर्णन करतो. सत्ययुगात दहा भुजा असलेले श्वेत कांतिमान कश्यपपुत्र सिंहध्वज महोत्कट विनायक काशीला गेले. तेथे नरांतक आणि त्याचा धाकटा भाऊ देवांतक या राक्षसांचा वध केल्यावर ते त्रेतायुगामध्ये षड्बाहू शिवनंदन मयूरध्वजाच्या रूपात प्रकट झाले.

***हत्वा तं कमलासुरं च सगणं  सिन्धु महादैत्यपम् ।***

***पश्चात् सिद्धिमतीसुतेकनलजस्तस्मै च ज्ञानं ददौ ।।***

***द्वापारे तु गजाननो युगभुजो गौरीसुतः सिन्दुरम् ।***

***संमर्द्य स्वकरेण तं निजमुखे चाखुध्वजो लिप्तवान् ॥ ४ ॥***

*अर्थात :* त्याने कमलासुर आणि महादैत्यपती सिंधूला त्याच्या गणांसहित वधले.

त्यानंतर ब्रह्माजींनी त्यांना सिद्धी आणि बुद्धी नावाच्या दोन कन्या दिल्या आणि ज्ञानही दिले. द्वापारयुगात गौरीपुत्र गजानन अवतारात ते द्विभूज होते. त्यांनी आपल्या हाताने सिंदुरासूरचे मर्दन करून त्याला आपल्या तोंडावर लेपले. त्यांच्या ध्वजावर मुषकाचे चिन्ह होते.

**❋गीताया उपदेश एव हि कृतो राज्ञे वरेण्याय वै ।❋**

**❋तुष्टायाथ च धूम्रकेतुरभिधो विप्रः सधर्मर्धिकत् ।।❋**

**❋अश्वांको द्विभुजो सितो गणपतिम्लेच्छान्तकः स्वर्णदः ।❋**

**❋क्रीडाकाण्डमिदं गणस्य हरिणा प्रोक्तं विधात्रे पुरा ॥ ५ ॥❋**

❋अर्थात :❋ त्याने संतुष्ट राजा वरेण्य याला गणेश–गीतेचा उपदेश केला. मग [कलियुगात] तो [श्रीगणेश] धर्मयुक्त व संपत्ती असलेल्या ब्राह्मण रूपात अवतरतील , ज्याला धुम्रकेतू म्हणतात. त्यावेळी त्यांच्या ध्वजाचे प्रतीक अश्व असेल. त्याला दोन हात असतील. तो गौरववर्णातील गणपती म्लेच्छांचा नाश करणारा आणि सुवर्ण देणारा असेल. गणपतीच्या या क्रीडाकांडाचे वर्णन पूर्वीच्या काळी भगवान विष्णूंनी ब्रह्माजींना केले होते.

**❋एतश्लोकसुपंचकं प्रतिदिनं भक्त्या पठेद्यः पुमान ।❋**

**❋निर्वाणं परमं व्रजेन्स सकलान् भुक्त्वा सुभोगानपि ॥ ६ ॥❋**

❋अर्थात :❋ जो मनुष्य प्रतिदिन भक्तिभावाने या पाच श्लोकांचे पाठ करेल तो समस्त उत्तम भोगांस उपभोगून अंती परम निर्माण मोक्ष प्राप्त करेल.

**❋॥ इति श्री पंचश्लोकि गणेशपुराण संपूर्णम् ॥❋**

# ❀ गणेश गीता ❀

श्री गणेशपुराणाच्या क्रीडाखंडाचे अध्याय १३८-४८ गणेश गीता नावाने प्रसिद्ध आहेत. ही गणेशगीता भगवदगीते पूर्वीची असून, गणेशगीतेतीलच बरेचसे विषय पुढे भगवद गीतेत आलेले दिसतात. श्री गणेश गीतेत एकूण अकरा अध्याय आहेत. गणपतीने आपल्या गजानन अवतारात ही गीता राजा वरेण्य यास सांगितली.गणेशाच्या अवतारकार्यातील एक प्रसंग ज्यामुळे 'गणेश गीता' भुलोकी आली -

एके दिवशी गजाननाने पाराशरऋषीला सिंदूराच्या जुलमाने सर्व यज्ञयागादी कर्मे बंद पडल्याचे सांगितले व त्याच्या वधाची आज्ञा मागून तो आपली आयुधे घेऊन, शिव-पार्वतींचे आशीर्वाद गर्जना करीत सिंदूराच्या नगरापर्यंत आला. गर्जनेने सिंदूरासह सर्व दैत्य मूच्छित होऊन पडले. दूतांनी त्यास तू कोण आहेस, असे विचारले असता मी पार्वतीशंकरांच्या उदरी जन्मलेला व पाराशरऋषींच्या वात्सल्याने वाढलेला प्रत्यक्ष परमात्मा आहे व गर्विष्ठ झालेल्या सिंदूराचा वध करण्यासाठी आलो आहे, असे सांगून त्याने सिंदुराला युद्धास आवाहन केले.

नंतर गजाननाने आकाश भेदणारी मस्तके आणि पाताळे भेदणारे पाय, अनेक मस्तके, अनेक नेत्र, अनेक हात असे विराट रूप धारण करून तो सिंदूराजवळ आला असता सिंदूर भयभीत झाला. पण धीर धरून गजाननावर आपल्या हातांतील खड्गाचा प्रहार त्याने केला. तोच गजाननाने त्याला धरले आणि आपल्या अंगाने त्याचे अंग मर्दून टाकले. त्याच्या अंगातील तांबड्या रक्ताने गजाननाच्या अंगाचाही रंग तांबडा झाला. त्यामुळे त्याला 'सिंदूरवदन', ' सिंदूरप्रिय' इत्यादी नावे पडली. अशा तऱ्हेने गणेशाने उन्मत्त सिंदूराचा वध केल्यावर देवांनी त्याचा जयजयकार केला. नंतर सर्व राजे गजाननाच्या भेटीसाठी आले. त्यात वरेण्य राजाही होता. त्याने गणेशाच्या स्वरूपावरून आपण अरण्यात टाकून दिलेला आपला पुत्र हाच हे ओळखले. [हा कथाभाग गणेश पुराणांत आहे] आपल्या अज्ञानाबद्दल गणेशाची क्षमा मागितली. तेव्हा गजानन म्हणाला, वरेण्या, खेद करू नकोस. तू आणि तुझ्या पत्नीनं पूर्वजन्मी अति तीव्र तपश्चर्या केली आणि तुम्ही मला मोक्ष न मागता मी तुमच्या उदरी जन्मास यावं असा वर मागितलात, म्हणून तुमच्या इच्छेप्रमाणं मी तुमच्या घरी आलो. आता मी निजधामास जातो. त्यावर वरेण्य म्हणाला,

`देवा, मला मोक्ष प्राप्त होईल असा काही उपदेश कर.`

त्यानंतर गजाननाने वरेण्याला योगमार्गप्रकाशक, सर्वसिद्धिदायक, अज्ञाननाशक आणि मनुष्यजीवनाचे उद्दिष्ट सांगणारी `गणेशगीता` सांगितली. ती सर्वांनी पठण

करण्यासारखी आहे. तिच्या श्रवणाने वरेण्य राजा जीवन्मुक्त होऊन मोक्षाला गेला.

## ❁ रत्ने आणि जीवन ❁

माझ्याकडे आलेले अनेक व्यक्ती मला विचारतात रत्न म्हणजे काय? व ते परिधान का करावे?

यावर माझं उत्तर असते रत्न म्हणजे अँटीना!

त्या त्या ग्रहांकडून ती ती तत्वे खेचून आपल्यामध्ये परावर्तित करण्याची क्षमता रत्नांमध्ये असते. उदाहरणार्थ पुष्कराज गुरु ग्रहा कडून उर्जा शक्ती घेऊन आपल्या शरीरात, मनात परावर्तीत करतो याच प्रमाणे इतर रत्ने हि विविध ग्रहांकडून अशी शक्ती परावर्तीत करतात. प्रश्न आहे कि मी कोणता रत्न धारण करावं. खरं तर या प्रश्नाची अनेक उत्तरं आहेत. जन्म कुंडलीतील वेगवेगळी स्थानं त्यात असणारे शुभ अशुभ ग्रह यावर कोणतं रत्न धारण कराव हे अवलंबून आहे. जे ग्रह जन्म पत्रिकेत अनिष्ट असतात त्या ग्रहांची रत्ने धारण केल्यास वाईट परिणाम घडतात. या व्यतिरिक्त जे ग्रह गोचरीने (सध्याच्या त्या ग्रहाच्या स्थानपरत्वे) खराब असतील त्याची ही रत्ने धारण करणे अशुभ फळे देऊ शकते. या साठी कोणतेही रत्न धारण करतानाच ते रत्न कधी काढून ठेवायचे हे सुद्धा माहिती असणे आवश्यक आहे अन्यथा एखाद्या ग्रहाची स्थिती चांगली आहे म्हणून रत्न धारण केले आणि कालांतराने तो ग्रह पत्रिकेतील वाईट ठिकाणी गेला तर तेच रत्न वाईट परिणाम करू शकते. पत्रिका पाहूनच रत्न धारण करणे कधीही चांगले. दशम स्थान व्यवसाय उद्योग, पंचम स्थान संतती, सप्तम स्थान पती / पत्नी, चतुर्थ स्थान घर अशा पत्रिकेतील स्थानांमध्ये असणाऱ्या ग्रहांचा अभ्यास करून अपेक्षित परिणामांसाठी रत्नाची निवड बिनचूक केली पाहिजे. रत्नांच्या गुणांचाही अभ्यास करून रत्न निवडले पहिजे.

उदाहरणार्थ मोती हे रत्न मन:शांती देते राग राग करणार्याला शांत करते. असाही गैरसमज आहे कि पुष्कराज कोणालाही चालतो, पण असं नाही. ज्याच्या पत्रिकेत गुरुग्रह बिघडलेला आहे त्याच्यावर पुष्कराज धारण केल्यास स्थान परत्वे अनिष्ट परिणाम प्राप्त होऊ शकतात.

अर्थात, साधना सामर्थ्य आणि आत्मिक शक्ती असणाऱ्याने कोणतेही रत्न धारण केल्यास ते रत्न त्याच्यावर काहीच बरे वाईट परिणाम करीत नाही असे दिसून येते. तसेच उपरत्ने जी असतात ती रत्ने सौम्य असतात आणि ती सुद्धा फारसे बरे वाईट परिणाम दाखवत नाहीत उदाहरणार्थ मन्त्रपाल नावाचा मंगळाचा खडा रत्नशास्त्रावर जितक लिहाव तीतक थोड आहे. रत्न माणसाच्या जीवनावर विलक्षण प्रभाव पाडू शकतात हे सर्वश्रुत आहे. पण या रत्नांचा वापर फलज्योतिषाच्या अभ्यासानंतरच करणे योग्य आहे. अभ्यास आणि वापरात रत्न जीवनाच्या कोणत्या गोष्टी साठी वापरायचे आहे, त्याच्याशी निगडीत पत्रिकेतले स्थान कोणते, त्या स्थानात कोणती रास आहे, तिचा राशी स्वामी कोणता आहे आणि त्याची सद्य स्थिती कशी आहे याचा अंतर्भाव असावा. रत्नांचा उपयोग करण्यापूर्वी, कोणते रत्न कोणत्या धातूत बसवून वापरावे हे तितकेच महत्वाचे आहे. त्याच प्रमाणे कोणत्या ग्रहाचे कोणते रत्न असते हे हि लक्षात घेतले पाहिजे.

आम्ही व्यक्तीची जन्मपत्रिका स्वतः मांडून अभ्यासतो व तिच्या अध्ययनानंतरच व्यक्तीच्या जीवनातील ग्रहांच्या व इतर बाबींच्या परिणामानुसार व्यक्तीस योग्य रत्न सुचवितो व त्यास कोणत्या प्रकारे धारण केले जाते याचे सुयोग्य मार्गदर्शन देतो.

आपण आपले रत्न आताच जाणून घेऊन जीवनातील अनेक दोष व अडचणींवर मात करू शकता. फक्त एका कॉलद्वारे...

**(किंवा याच क्रमांकावर Whatsapp मेसेज करावा)**

# ❁ सभासदांचे लेख ❁

**हा प्रसंग फार जुना नाही फक्त तीन-चार वर्षे झाली असतील.** आमच्या शाळेला उन्हाळी सुट्ट्या लागल्या होत्या. जवळपास तीन महिने सुट्टी असल्याने आम्ही मित्रांनी काश्मीर फिरायला जाण्याचा निश्चय केला. आमच्या मधील एक मित्र आधीच काश्मीर ला पोहोचला. व आमच्या आवडीला लक्षात ठेवून त्याने राहण्यासाठी एक हाऊस बोट भाड्यावर घेतली. पाण्यावर तरंगणाऱ्या जहाजावर बनवल्या जाणाऱ्या घरांना 'हाऊस बोट' म्हटले जाते.

दोन दिवसानंतर आम्ही सर्व मित्र काश्मीर ला पोहोचलो. मी आयुष्यात पहिल्यांदा हाऊस बोट पाहिली होत. आमची हाऊस बोट काश्मीरमधील डल झील वर होती. डल झील जवळपास 18 किलोमीटर क्षेत्रात पसरली आहे व तिच्या तीनही बाजूंना मोठ-मोठे पर्वत आहेत. डल झील सारखा निर्मळ व सुंदर तलाव मी आयुष्यात पहिल्यांदाच पाहिला. आम्ही आमच्या हाऊस बोट मध्ये शिरलो. बोट च्या बाहेर सुंदर तलाव आणि सुंदरश्या हाऊस बोट मध्ये आम्ही सर्व मित्र सकाळ संध्याकाळ जेव्हाही इच्छा झाली तेव्हा तलावात उडी घ्यायचो. आणि जोपर्यंत आंघोळ करून थकत नाही तोपर्यंत मस्ती करायचो.

एक दिवस आम्ही सर्व मित्रांनी डल झील च्या दुसऱ्या किनाऱ्यावर असलेल्या शालिमार बागे पर्यंत जाण्याचा निश्चय केला. खाण्यापिण्याचे सामान, हार्मोनियम व इतर वस्तू नाव मध्ये ठेवून, सोबत एका नाविकाला घेऊन आम्ही शालीमार बागेकडे निघालो. दिवस छान होता म्हणून नाव चालवण्यात आनंद येत होता. परंतु जसेही आमची नाव डल झीलच्या मधोमध पोहोचली तसे आकाशात ढग दाटून आले.

आमच्या सोबत असलेल्या नाविकाने आम्हाला पुढे न जाता लवकरात लवकर परत फिरण्यास सांगितले. कारण समोरून जोरदार वादळ येण्याचे भय होते. परंतु आम्ही त्यांच्या सल्याचा विरोध केला. आणि सर्वाधिक विरोध मीच केला. मी सांगितले की जेवढा वेळ आपल्याला परत जाण्यास लागेल तेवढ्या वेळात तर आपण शालिमार बाग पर्यंत पोहचून जाऊ. नाविकाला नाईलाजाने आमचे म्हणणे मान्य करावे लागले. आता

आम्ही सर्वजण दुप्पट उत्साहाने नाव चालवू लागले.

या गोष्टीला दहा मिनिटे झाली होती एवढ्यात हवेचा एक हलकासा झोत आमच्या डोक्यावरून गेला. नाविकाने आम्हाला संपूर्ण बळ लाऊन नाव ढकलायला लावली. परंतु आकाश फार चंचल झाले होते. सुंदर ढग भयंकर विजेने कडाडू लागले. शांत असलेल्या डल झील मध्ये भयंकर लाटा वाहू लागल्या. लहरींच्या झटक्यामुळे आमची नाव वरखाली होऊ लागली. भयंकर परिस्थितीत मृत्यू समोर उभी होती आम्ही जगण्याची आशा सोडून दिली. नाविक आम्हाला धैर्य ठेवण्यास सांगत होता. परंतु आमच्या मनाचे संतुलन बिघडले होते. आणि एवढ्यातच एक जोरदार लाट आली व आमची नाव पलटली.

यानंतर काय झाले मला काहीच माहित नाही. परंतु जेव्हा माझे डोळे उघडले तेव्हा मी स्वतःला श्रीनगर मधील एका रुग्णालयाच्या पलंगावर पाहिले. मी खूप घाबरलो, समोर उभ्या असलेल्या एका नर्सला माझ्या मित्रांबद्दल व मी येथे कसा आलो हे विचारले. नर्स मला सांत्वना देत म्हणाली की माझ्या सर्व मित्रांना सुखरुप वाचवण्यात आले आहे. व ते सर्व याच दवाखान्यात आहेत. नंतर मला माहीत पडले की आमची नाव किनाऱ्यावर येऊन पलटली होती. व समोर असणाऱ्या काही नाविकांनी आमचे आवाज ऐकून आम्हाला वाचवले होते. या नंतर मी आम्हाला वाचणाऱ्या सर्व लोकांना मनोमन धन्यवाद दिले.

आज या घटनेला घडून जवळपास चार वर्षे झाली आहेत, परंतु तरही असे वाटते की हा कालचाच प्रसंग आहे. जीवन व मृत्यू हे सर्व परमेश्वराच्या हातात असते. म्हणूनच मला व माझ्या मित्रांना या कठीण प्रसंगातून वाचवल्याबद्दल मी नेहमी परमेश्वराचे धन्यवाद करीत असतो. अंगावर शहारे उभे करणारा हा प्रसंग माझ्या आयुष्यातील अविस्मरणीय क्षण होता.

– मोहित पाटील, पेण

## एक छान गोष्ट मला आवडलेली.....

राजू बाबांबरोबर सर्कस बघायला गेला. तिकिटांच्या रांगेत असतांना त्याची नजर साखळीने बांधलेल्या हत्तीच्या पिल्लाकडे गेली.

ते हत्तीच पिल्लू जोरजोरात धडक देत तर कधी सर्व शक्ती लावून साखळी तोडण्याचा प्रयन्त करत होते, पण त्याला यश येत नव्हते.शेजारी त्याच्या आईलाही तसेच बांधून ठेवले होते पण ती स्वस्थपणे उभी होती.

राजूची उत्सुकता वाढली.

"बाबा त्या हत्तीच्या पिल्लाला ती साखळी तोडणे कठीण आहे. पण त्याची आई ती सहज तोडू शकते ना? मग ती स्वतःची अन् तिच्या पिल्लाची सुटका का करून घेत नाही?"

राजू च्या प्रश्नावर बाबा निरुत्तर झाले, पण सर्कसच्या मनेजरने तो प्रश्न ऐकला.

"त्याच अस आहे बाळा, ह्या हत्तीच्या आईलाही ती लहान असतांना इथे आणलं गेलं. तिलाही याच साखळी ला आम्ही बांधत असू , सुरवातीला दोन महिने तिनेही सुटकेचा असंच प्रयत्न केला. तेव्हा ती साखळी तोडणे आपल्या शक्तीबाहेर आहे, अशी तिला जाणीव झाली.अन् आता मोठी झाल्यावरही तिच्या मनात तेच बिंबून गेलंय. अशा दहा साखाल्याही ती तोडू शकेल एवढी ताकद तिच्या अंगात आहे, पण पुन्हा प्रयत्न करण्याचा विचारही तिच्या मनात येत नाही. उलट तिच्या पिल्लाचे तिला हसू येत असेल."

आपलही असंच होतं. एखाद्या गोष्टीत अपयश आल्यावर 'ते आपल्याला जमणार नाही' असं मनात ठरवून चालतो.कालांतराने गोष्टी बदलतात. अन् आता आपल्याला शक्य असूनही आपण प्रयत्न करीत नाही.

म्हणूनच कुणी म्हटलंय.." तुम्ही तो पर्यन्त हरत नाही, जो पर्यन्त तुम्ही प्रयत्न करायचे सोडत नाही !"

– स्वप्नाली मुंगसे, बीड

**याबद्दल मी माझे वैयक्तिक मत मांडणार आहे,त्यामुळे मतभेद असू शकतात.**

माझं बालपण मामाच्या गावी गेलं.माझे आजोबा वारकरी होते,त्यामुळे घरी मोठा देव्हारा होता.त्यामुळे मला देवपुजेची आवड होती.पण नंतर जशी बुद्धी वाढत गेली, तसा मी विज्ञान निष्ठ बनलो,थोडक्यात ९९ टक्के नास्तिक आणि १ टक्के आस्तिक झालो होतो.देवाच्या पाया सुद्धा मी नाईलाजाने पडत असायचो. हा झाला भूतकाळ.

२०१६-१७ ची गोष्ट.मी देवाला ना मानत होतो पण कधी पूजा केली नाही. २०१६ च्या दिवाळी नंतर माझी आई खूपच आजारी पडली.तिच्या अंगात ताप मुरला होता आणि अगदी रक्तात भिनला होता.तिला अचानक घाम येई,अचानक थंडी वाजू लागे.डॉक्टर चे उपचार सुरू होते,पण गुण येत नव्हता.

संक्रांत झाली आणि आई खूपच आजारी पडली.तिच्या जीवाची काहीली होत होती.मी तिच्या उशाशी बसून तिचा हात हातात धरून तिला धीर देत होतो, तीही डोळ्यातून पाणी काढत होती.

तेव्हा आम्ही गावापासून खूप दूर शेतात राहत होतो,जवळपास कोणतेही घर,दुकानं,दवाखाना काहीही नव्हतं.

माझ्याकडे सायकल होती.त्या दिवशी सायंकाळी मी सायकल घेऊन बाहेर पडलो आणि अचानक मी स्वतःहून गेलो की कसा गेलो माहीत नाही मी देवाच्या मंदिराजवळ गेलो,सायकल तिथेच ठेऊन मी आत गेलो.मंदिर गावाबाहेर होत त्यामुळे निर्जन होत.तिथ जाऊन मी देवाचे दर्शन घेतलं आणि माझ्या डोळ्यातून अचानक पाणी आलं आणि मी मनातून बोललो की,"देवा आजवर मी तुझी पूजा केली नाही, मी उपवास केला नाही.पण इथून पुढे मी काही नाही जमलं तरी उपवास तुझ्यासाठी म्हणून करेन,पण माझ्या आईला बरे कर.दुसरं मी काहीही तुझ्याकडे मागत नाही!"

जवळपास १५ दिवस झाले आणि आईला फरक जाणवू लागला आणि ती महिन्याभरात ठणठणीत झाली.ही गोष्ट मी आजही तिला सांगितली नाही.कारण तिने माझ्यासाठी कित्येक उपवास केले होते लहानपणी जेव्हा माझी तब्बेत खूपच ढासळली होती तेव्हा,तर मीही तिच्यासाठी आणि तिच्या आरोग्यासाठी का नाही उपवास करू शकत?

माहीत नाही कदाचित हे माझ्या श्रद्धेमुळे असेल की कशाने पण नंतर जेव्हा मी मंदिरात गेलो तेव्हा मी त्याला दंडवत च घातलं आणि म्हटलं, " देवा तू माझ्या आईला बरे केलेस, तुझे खूप उपकार झाले माझ्यावर. "

थोडक्यात इतकं च की मी अंधश्रद्धा अजिबात मानत नाही, पण देवावर माझी श्रद्धा आणि विश्वास होता तो ह्या घटनेने अजुन वाढला.

– विकास मोरे, पुणे

# *पितृदोष*

पितृदोष हा देवकोपाइतकाच दृढ समजला जातो. पितर कोपले, तर घरात दुष्काळ पडणे, आजारपण येणे, विनाकारण चिडचिड करणे, जेवतांना भांडणे आणि अन्न खाऊ न देणे असे त्रास होतात. एखादा भ्रमिष्ट होतो. मूल होत नाही किंवा प्रखर पितृदोष असल्यास अपंग मुले जन्माला येतात. मुले नीट वागत नाहीत, आई-वडिलांचे ऐकत नाहीत इत्यादी त्रासही होतात. त्यासाठी प्रत्येकाने न चुकता वर्षातून एकदा पितरांच्या नावाने श्राद्ध करावे. श्राद्ध करायला जमत नसेल, तर नदीच्या पाण्यात दहीभात सोडावा किंवा घरातच जेवणापूर्वी अन्नाचा घास ठेवून नम्रपणे हात जोडून प्रार्थना करावी.

आपल्या हिंदु संस्कृतीत मातृ-पितृ पूजनाला अतिशय महत्त्व आहे. तसेच मागील दोन पिढ्यांचेही स्मरण ठेवावे. पितृवर्ग ज्या लोकात रहातात, त्याला पितरांचे जग किंवा पितृलोक म्हणतात. ते नेहमी मुक्तीची वाट पहात तेथे वावरत असतात. तसेच ते आपल्या पुढच्या पिढीचे कर्तृत्व आणि यश-अपयश पहात असतात. त्यांचे स्मरण ठेवून श्राद्धानुसार जे अन्नदान करतात, त्यांचे कल्याण होते. आई-आजी-पणजी यांच्यासाठी वृद्ध स्त्रीला अन्न आणि साडी-चोळी दान द्यावी अन् गाईला घास द्यावा. काही पूर्वजांनी कुणाला तरी दुखावलेले असते. त्यांचे घर, मालमत्ता किंवा पैसा हडप करणे, स्त्रीवर अत्याचार करणे, एखाद्याची फसवणूक करून त्याला अन्नाला महाग करणे, एखाद्याच्या आजीला अन्न-पाणी आणि औषधांवाचून तडफडून मरण येणे, अशा प्रकारचे त्रास दिलेले असतात. ते सर्व शाप पुढील जन्म झालेल्या पिढीपर्यंत त्रास आणि भोग या स्वरूपात येतात. घराण्यात एखादा पाण्यात बुडून मेला, एखाद्याची फाशी, हत्या किंवा अपघात झाला असेल, अशांच्या घरात एक पिढी सोडून पुढच्या पिढीला भयंकर कष्ट सोसावे लागतात. हे सर्व पितृदोष आहेत. ते कर्म बनून आडवे येत रहातात आणि प्रगतीला खिळ बसते. प्रामाणिक माणसांचे अंतरंग पितरांना दिसते. त्यामुळे त्यांच्याविषयी वाईट बोलू नये. एखाद्यावर पितर प्रसन्न असल्यास त्यांची भरभराटही होऊ शकते.

**आपल्या जीवनात देखील पितृदोष आहे का हे जाणून घ्या**

**(किंवा याच क्रमांकावर Whatsapp मेसेज करावा)**

## ❊ मजेशीर विनोद ❊

सर :

✻Time✻ ची definition सांगा

गण्या:

Ti (ती) आणि me (मी)

मिळून घालवलेला वेळ

म्हणजे Time

सरांनी time न घालवता धुतला

....

तुम्ही किती पण श्रीमंत

असुद्या ग्यास सिलेंडर

तुम्हाला

चेंबलेला.. आपटलेला..

रंग

गेलेलाच मिळणार

....

मुकेश अम्बानी : अगर मै सुबह से अपनी कार में निकलू तो शाम तक अपनी आधी प्रॉपर्टी भी नहीं न देख सकता!

!

!

!

!

!

!

!

पाटिल: आमच्याकडं बी हुती तसली खटारा कार... !

ईकुन टाकली........

....

लॉकडाऊनमुळे अनेकांनी नोकऱ्या गमावल्या.

असाच एक इंजिनीअरही बेरोजगार झाला.

पडेल ते काम करायचं म्हणून तो नोकरी शोधू लागला.

सगळीकडे त्याला नकारच मिळत होता.

एकेदिवशी तो सर्कस पाहायला गेला.

सर्कस पाहून त्याच्या डोक्यावरचा ताण थोडासा हलका झाला.

त्यातच त्याला सूचलं की, इथे एखादी तरी नोकरी नक्कीच असेल.

तो सर्कस अरेंज करणाऱ्या मुख्य मालकापर्यंत जाऊन पोहोचला आणि नोकरीसाठी विचारणा केली.

त्या मालकानेही जवळपास नकारच कळवला.

फक्त एक माकडाचा गणवेश घालून लोकांना हसवण्याचं काम आहे असं त्याने सांगितलं

बेरोजगार इंजिनीअर एका पायावर तयार झाला.

दुसऱ्या दिवशी नोकरी सुरू झाली.

माकडाचे हावभाव करत लोकांना हसवण्याचं कामही छान जमायला लागलं.

एकेदिवशी माकडाचा गणवेश घालून उड्या मारणारा इंजिनीअर वरून चुकून वाघाच्या पिंजऱ्यात पडला.

लोकही आश्चर्यचकित होऊन केवळ पाहत राहिले.

आपला शेवट जवळ आलाय हे समजल्यावर तो तसाच बसून राहिला आणि या बेरोजगारीने आपला कसा बळी घेतला याचा विचार करू लागला.

तेवढ्यात दुसऱ्या टोकाला असलेला वाघ हळूहळू जवळ यायला लागला...

लोक आता स्तब्ध होऊन पाहू लागले...

शेवटी वाघ जवळ आला आणि हळूच त्या माकडाच्या कानात पुटपुटला,

*"शिंदे, घाबरू नको. मी, पळशीकर, २००९ मेकॅनिकल बॅच !"*

....

लग्नाच्या पंगतीला एका अनोळखी व्यक्तीला बघून वधू पित्याने विचारले

"तुम्हाला मी आमंत्रण दिलं होतं का ?"

माणूस तापून लालबुंद झाला आणि म्हणाला

"न्हवतं दिलं........ मग ती माझी चूक आहे का तुमची ?"

...

एक दाढीवाला टीसीला म्हणाला ' "औरंगाबाद २ वाजता येईल, तेंव्हा मला उठव, नाही उठलो तर जबरदस्तीने उतरवून दे."

सकाळी ७ वाजता दाढीवाल्याला जाग आली. औरंगाबाद मागे पडून मुंबईत ट्रेन पोचली होती. दाढीवाल्याने रागारागाने टीसीला अपशब्द बोलण्यास सुरुवात केली.

प्रवासी म्हणाले, 'तो एवढ्या अपशब्द बोलतोय. तुम्ही शांत राहून का ऐकताय ?'

टीसी म्हणाला, विचार करतोय... मी ज्या दाढीवाल्याला २ वाजता जबरदस्तीने औरंगाबादला उतरवलं, तो किती अपशब्द देत असेल...'

....

# ❊ भन्नाट कोडी ❊

**१) वडिलांनी मुलीला एक वस्तू दिली आणि सांगितले की भुख लागली तर खाऊन घे, तहान लागली तर पिवून घे आणि थंडी वाजली तर जाळून घे. ही वस्तू कोणती असेल?**

उत्तर : नारळ

**२) काळा घोडा पांढरी स्वारी, एक उतरवला तर दुसऱ्याची पाळी.**

उत्तर: तवा आणि पोळी

**३) असे काय आहे जे नेहमी तुमच्या पुढे असते परंतु तुम्ही त्याला पाहू शकत नाहीत.**

उत्तर: भविष्य

**४) अशी कोणती वस्तू आहे की पावसात कितीही भिजली तरी ओली होत नाही.**

उत्तर: पाणी

**५) माझा भाऊ मोठा शैतान, बसतो नाकावर पकडून कान. ओळख पाहू कोण?**

उत्तर: चष्मा

**६) डोळे आहेत पण पाहू शकत नाही, पाय आहेत पण चालू शकत नाही, तोंड आहे पण बोलू शकत नाही. सांगा पाहू मी कोण?**

उत्तर: बाहुली

**७) जगभराची करतो सैर, जमिनीवर ठेवत नाही पैर (पाय). दिवसा झोपतो रात्री जागतो. सांगा पाहु की कोण?**

उत्तर: चंद्र

**८) एवढासा गडू त्याला पाहू रडू.**

उत्तर: कांदा

**९) वाचणे लिहिणे दोन्ही ठिकाणी असते माझे काम, कागद नाही पेन नाही सांगा माझे नाव.**

उत्तर: चष्मा

**१०) अशी कोणती गोष्ट आहे जी पाणी पिल्या बरोबर नष्ट होते.**

उत्तर: तहान

**११) निकेत च्या वडिलांची चार मुले आहेत. 1) रमेश 2) निलेश 3) गणेश चौथ्या चे नाव सांगा.**

उत्तर: नीकेत

# आपल्या बालमित्रांची चित्रे

कल्पेश कुलकर्णी, रत्नागिरी

माधव गोंधळी, संभाजीनगर

केवल्या राणा, मुंबई

यश जावडेकर, पुणे

माधवी भोसले, मरकळ

सागर नाथ, रायगड

# ❀ निरोप ❀

बहुउपयोगी असलेला हा श्री गणेश उत्सव विशेषांक वाचकांच्या हाती देताना विशेष आनंद होत आहे. या अंकात प्रामुख्याने श्री गणेशांविषयी सर्वसामान्यत: माहिती नसणाऱ्या माहितीचाच समावेश केला गेला आहे. तसेच गणपतीच्या आरती वगैरे वगैरे साधारण बाबी वगळण्यात आल्या आहेत, कारण अशा प्रकारच्या सामान्य माहिती सहज कोठेही उपलब्ध होतात. त्याऐवजी यात विविध स्तोत्रे व साधना दिल्या गेल्या आहेत. याशिवाय अन्य देखील भरपूर बाबींचा यात अंतर्भाव आहे.

एका अर्थाने तथास्तु ज्योतिषचा हा विशेषांक गणेशभक्तांसाठी एक पर्वणीच आहे असे म्हणल्यास वावगे ठरणार नाही!

जर कोठे काही टायपिंग मिस्टेक असली तर कळवावे! बहुत काय लिहिणे!!

**जय गजानन...**